


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका












अनुक्रमणिका





भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक




मूल्य १। रुपया

साहित्य • कला • संगम



संपूर्ण कथा–अंक • जुलै १९६६ : वर्ष २२ वे

## श्रेयनामावलि–

● **याची देहि, याची डोळा—अ. अं. कुलकर्णी** यांची एक प्रदीर्घ उपरोधिका ● **अंदमान ते आनंदमान—श्री. माधव राजवाडे** यांचे प्रवासवर्णन म्हणजे एक कायाकल्प–कथाच ● **मानवतेचं मॅनहोल—रमेश मंत्री** यांनीं 'भंकस'पणाचा केलेला मर्मभेद ● **क्षिप्रेकाठी—जितेन्द्र अभिषेकी** यानी रंगवलेली प्राणिसृष्टीतल्या इमानाचीं रसरशीत कथा ● **फुंकर—रत्नाकर गोवईकर** यानी छेडलेलो हळुवार तार (भावकथा) ● **ती भेट—द्रा. गो. देशपांडे** यांची एक आगळी 'सिनि'कथा ● **पुनवेची रात—शंकर इनामदार** नाजुक भावफुलांची बरसात करून जातात ● **लक्ष्मी—सुरेश वेंगुर्लेकर** यानी मानवी मनाचा घेतलेला एक विलक्षण शोध ● **हारजीत—प्रा. सुरेश गजेंद्रगडकर** यांची लहानशीच पण 'जीत' करील अशी कथा ● **अज्ञात हितकर्त्ता—श्री. बाबुराव कामत** यांची एक चित्तथरारक (खरोखरच) सत्यकथा.

शिवाय असे पाहिले असे ऐकले, दीपमाला, पानपुरी, आपलेही एकमत हीं नेहमीची गाजलेली सदरें आणि–कर्मकथा, रहस्यकथा, श्लील कथा, 'पणती' कथा, 'धुंदफुंद' कथा वगैरे बेफाम विनोदी बिगचित्र कथा.

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टूडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay – 4.



अनुक्रमणिका

## दीपावली

### दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी** १६–००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# 'पारा' पकडण्याचा प्रयत्न

ह्या सृष्टीचा निर्माता ब्रह्मदेव हा एक मोठा कल्पक, रसिक व सूक्ष्माचा वेध घेणारा, सूक्ष्माचेच वेड असणारा कथाकार आहे. क्षणाक्षणाला त्याला नवी नवी स्वप्ने पडतात. ती स्वप्ने साकार होऊं देत असे तो म्हणतो आणि तीं रूपें घेऊन साकारतात. त्या रूपांना व्यक्तित्वही तोच कथाकार देतो. आकार, रंग, रूप, गंध सारे कांही तोच अर्पण करतो. तो म्हणतो "फुले येऊ देत." फुले जन्मतात. तो म्हणतो "उद्याने हवीत," उद्याने होतात. तो म्हणतो "ज्वालामुखीचे स्फोट हवेत." स्फोट होतात. तो म्हणतो "मृत्युचे तांडव दिसू देत" आणि एखाद्या भाषिक पिसाटाच्या रूपाने वा नागा नामक माणसाच्या रूपाने मृत्युतांडव करून जातो. ह्या सृष्टीतली मंदिरे, महाल, तेथल्या मैफली स्वरांचे, नादांचे ब्रह्म, झोंपडीत गवसणारा 'हिमालय' आणि रंगमहालातले खुजे, मुलांतले महापुरुष आणि महापुरुषांची कायरता, कामातुर जंतु आणि कामविजेते शुक–रामदास ही सारी रूपे अखेर त्या कथाकाराचीच कलानिर्मिती. त्याला कथेसाठी महालातही जावे लागते आणि त्याला स्मशानही चालते. त्याला झोंपडीतही माणसे गवसतात आणि हाटातही! उद्यानेही चालतात आणि त्याची एखादी कथा हिमालयांच्या अत्युच्च शिखरावर सुवर्णाच्या अक्षरांनी लिहिली जाऊं शकते. हे सारे विश्व हीच मुळी एक कलानिर्मिती आहे. ही विविध रूपे न्याहाळत बसलं तरी किती मौज वाटते. म्हणून तर ही रूपे अजून गवसत नाहीत. मनांचा शोध घेणाऱ्या शास्त्राला आणि शास्त्र्यांना त्याचा अंतिम शब्द गवसला नाही. सांपडला असं त्यांना वाटतं. "हेच ते रूप" म्हणून ते ओरडतात. पण क्षणांत एक आगळेच रूप दिसू लागते. अजूनपर्यंत तरी 'नेमि–नेति' असंच उत्तर हे सारे शास्त्री देत आले आहेत. कारण क्षणाक्षणाला नवे रूप घेणारे हे भावविश्व त्यांना शब्दांत कसे पकडता येणार? ह्या नव्या नव्या रूपांचेच तर कधीही न संपणारे आकर्षण माणसातल्या कथाकारांना, शास्त्रज्ञांना, तत्वज्ञांना वाटत आले आहे. म्हणून 'व्यासांनी सारे जग उल्टे' करून टाकले असतांही नवे नवे कथाकार पुढे येतच आहेत. नवी नवी कथा लिहिली जातच आहे. नवी नवी रूपे ती घेतच आहे. मानवातल्या 'नव्या मानवाचा' शोध ते घेतच आहेत. कथेचे वेड हे सनातनाचे वेड आहे. आणि कथेचा आत्माही सनातन आहे. त्या सनातनाचा शोध घेण्यासाठी, त्यात सूक्ष्मतेने वास करणाऱ्या सत्याचा परिचय करून घेण्यासाठी ब्रह्मदेवही धडपडतो आणि ब्रह्मदेवाची सृष्टि सुंदरतर करून नव्या रूपात जगाला प्रदान करणारा आजचा कथाकारही धडपडतो. त्या धडपडीतूनच कथा जन्म घेते. तिला केवळ सोयीसाठी आम्ही नावे देतो. पण ते नाव म्हणजे ती कथा नव्हे. तिचे संपूर्ण वर्णनही नव्हे. पाऱ्याला 'पारा' म्हटल्याने तो पकडता येतो थोडाच!!

'दीपावली'चा हा कथा अंक आपणांसारख्या रसिक वाचकांच्या हाती देतांना निदान आमची तरी हीच भूमिका आहे. कलेच्या (व कथेच्या) रूपाने घडत असते अंशात्मक विश्व दर्शन! ह्या अंकातल्या कथांची निवड व मांडणी करतांना हे 'दर्शन' घडावे–घडवावे हीच भूमिका ठेवली आहे.

ब्रह्मदेवाची ही प्रतिसृष्टि अंशात्मक सत्यदर्शन घडवीत आहे ह्याचा प्रत्यय कथा-अंक वाचून खात्रीने येईल. अर्थात हा अंतिम शब्द नाही. (म्हणून तर मग दिवाळी अंक, कथाविशेषांक वारंवार व चांगले निघतात.) पण ही प्रतिसृष्टि ब्रह्मदेवाच्या मूळ कलात्मक सुंदर सृष्टीशी कुठे तरी मिळतीजुळती आहे. तिचे आणि हिचे कुठे तरी 'प्राकृतिक' नाते आहे ह्याचा प्रत्यय 'दीपावली'च्या रसिक वाचकांना मिळाला तरी आम्हांला आनंद वाटेल.

–संपादक





अनुक्रमणिका

## जाणत्यांची शाबासकी

सप्रेम सा. न. वि. वि.

'दीपावली'चा 'मेचा संगीत विशेषांक वाचून आनंद झाला हे तुम्हाला आवर्जून कळवावेसे वाटते. इतका उपयुक्त, भरदार आणि माहितीपूर्ण संगीत विशेषांक यापूर्वी क्वचितच कुणी काढला असेल.

सर्वत्र लेख मला आवडले. श्री भोवे यांची 'रामतन्' श्री आरविंद मुळगांवकर याची 'एकलव्य' आणि जितेंद्र अभिषेकी यांची 'मारवा' या गोष्टीहि मी वाचल्या व आवडल्या. श्री. मुळगांवकर या नवीन लेखकाचे मी स्वागत करतो.

श्री. अशोक दामोदर यांचा रेडियोवर, श्री. आठवले यांचा संगीताच्या वैष्णव परंपरेवर, श्री. जी. एन्. जोशी यांचा भावगीतावर हे सर्वत्र लेख अतिशय उपयुक्त व माहितीने भरलेले आहेत.

श्री. भीमसेन यांच्या वडिलांनी आपल्या कर्तृत्ववान पुत्रावर एक अतिशय उत्कृष्ट चरित्रलेख कानडीमध्ये लिहिला आहे हे मला माहित होते व त्याचे मराठीमध्यें भाषांतर करण्याविषयी एक दोन मित्रांनाहि मी सुचविले होते. पण ते काम तुम्ही घडवून आणले, याबद्दल तुम्हाला धन्यवाद. एका ख्यातनाम गायकाची बाल्यावस्थेतली आणि तारुण्यातली संगीताविषयींची ओढ आणि जिद्द आणि तीहि प्रत्यक्ष वडिलांनींच वर्णन केलेली यामुळे मराठी वाचकांना वाचावयास मिळाली. तुमचे मन:पूर्वक अभिनंदन.

प्रत्येक गायकाने व संगीताच्या अभ्यासकाने हा अंक संग्रही ठेवावा असेहि मला सुचवावेसे वाटते.

कळावे लो. अ. ही. वि.

वाळकेश्वर रोड, आपला,
मुंबई **वामन हरी देशपांडे**

## आतां 'चित्रपट अंक' काढा !

स. न. वि. वि.

दीपावलीच्या आकर्षक मुखपृष्ठाबरोबरच असणाऱ्या लेखांचा 'संगीत विशेषांक' वाचला, कामाच्या बाहुल्यामुळे अभिप्राय पाठविण्यास उशीर होतोय क्षमा करालच.

चित्रपट संगीतातच ज्याला काही कळतेय व 'शास्त्रीय रागदारीत' जो बोअर होतो अशा मला, आपला अंक आदर्श वाटला. सामान्यतः आम्हीं अशा संगीताच्या बाबतीत उदासीन रहातो कारण रागदारीतले काहींही कळत नाही. उदा. 'चिजा' म्हणजे काय ? शब्दा शब्दातही संगीत कसे उत्पन्न होईल हें 'सुंदर चिजांतील दुग्ध शर्करा योग' वरून तरी कळून येईल.

आकाशवाणीचे कार्यक्रम कधी कधी फारच निरस वाटू लागतात व त्याबद्दल अशोक दामोदर ह्यांनी 'बहुजन हिताय बहुजन सुखाय' द्वारें आकाशवाणीची जी चिरफाड केली ती योग्यच आहे.

'रामतनू मिश्र' व 'भीमसेन जोशी' ह्यांच्या खास लेखाबद्दल आपले संगीत अभिनंदन.

त्याच बरोबर एकलव्य हा लेख खास लखनौवी 'स्टाईल'मध्ये लिहिल्याने माझे तेथील मित्र बहोत खूष आहेत. अभिनंदनाचा स्वीकार करणे प्राप्तच आहे.

आपला संगीत विशेषांक वीणेच्या तारा छेडून मृदु संगीत प्रसारीत करून गेलाय्, चित्रपट विशेषांक आणखी खास अंक ह्यांचे स्वागत करण्यास आम्ही आतूर आहोत.

चित्रपट विशेषांकांत भरपूर चित्रें व मराठी इंग्रजी बोलपटाबद्दलही मुबलक परीक्षण असावे.

आपलाच,
कोईम्बतूर **सुरेश पतंगे**

## 'अग्रगण्य' मासिक

स. न. वि. वि.

आपला मे १९६६ चा दिपावली संगीत विशेषांक वाचला. माझ्यासारख्या संगीताच्या क्षेत्रांत सर्वस्वी अनभिज्ञ असणाऱ्या व्यक्तीने सुद्धा एखाद्या बुभुक्षितासारखा हा अंक अथ पासून इति पर्यंत वाचून काढला. यांतच त्याची श्रेष्ठता सामावली आहे. मराठींत जी कांहीं २।४ दर्जेदार मासिके आहेत त्यांत दिपावलीचे स्थान अग्रगण्य आहे हे निर्विवाद. एकलव्य, तानसेन, मारवा या संगीत प्रधान कथा त्यांतल्या दर्दींनीच लिहिल्या आहेत हे न सांगताही कळून येते.




संगीत विषयक लेख तर निवडक असेच आहेत. त्यांतल्या त्यांत 'वंदन त्या ईशा' हा लेख विशेष पसंत पडला. सत्याचा अपलाच कल पहाणाऱ्यांना शिक्षा देण्याचे रुक्ष काम करणाऱ्या श्री उर्सेकरांचा आत्मा संगीताचाच आहे हे पाहून नवल वाटले. राजकारणांतील 'सूर–आसूर' उल्लेखनीय आहे.

शितावरून भाताची परीक्षा होत असते. हा एक अंक जरी वाचला तरी 'दिपावली'ला १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र उगीच मिळाले नाही हे पटते.

यापुढेहि असेच दर्जेदार साहित्य वाचायला मिळेल अशी आशा, नव्हे विश्वास वाटू लागला आहे. अशीच दिपावलीची प्रगती होवो. ही सदिच्छा.

आपली नित्य वाचक
घुळे **विद्या काळे**

### प्रिय वाचक

**दीपावलीच्या जून महिन्याच्या अंकांत आमच्या नजरचुकीमुळे–थोडी थोडकी नव्हे–आठ पाने मजकूर, मुद्राराक्षसाने–नव्हे–रावणाने–प्रचंड गोंधळ करून ठेवला. आमच्या चिकित्सक वाचकानी–ज्यांना असे अनवधानाने–कधी कधी घडते याची जाणीव आहे त्यांनी–सहानुभूतीपूर्वक विचारणा केली त्याबद्दल त्यांचा मी अत्यंत अभारी आहे**

**परंतु झाली चूक ही मुद्दाम केलेली नाही हे नजरेस आणून यापुढे अशी चूक न होण्याची दक्षता घेतली जाईल असे आश्वासन देऊन वाचकांजवळ दिलगिरी व्यक्त करतो.**

**संपादक**










*स्वर्गातला राज्यकारभार तरी आपल्या 'देशी' कारभारापेक्षां वेगळा असेल, 'परफेक्ट' असेल अशी धोंडो गुंडोची कल्पना होती. पण चौकशी अंती—*
*(न मरताही) स्वर्गाची ही सफर करू या!!*

**अवसरी** एक तालुक्याचे गांव. तेथे धोंडो गुंडो अवचट नामे एक गृहस्थ राहत असे. गृहस्थ मोठा लटपटचा आणि एक नंबरचा लफडेबाज. त्याचा मेन धंदा कोर्टात साक्षी देण्याचा. आवांतर टाईमात भोळ्या भाबडयांना बुडविणे आणि बाया बापडयांना नाडणे हे पोट धंदे तो करी. या गृहस्थाचा एक पाय घरात तर दुसरा नित्य कोर्टात असे. सकाळचे साडेदहाचे जेवण कधी तो शांततेने जेवला असेल तर शपथ! पिठलं त्याला फार आवडे. त्याची बायको त्याच्यासाठी नेहमी पिठले करी पण दुपारी तो कधीच धड पोटभर जेवत नसे.

"आवडे पिठलं छान झालय् पण आता कोर्टात जायची वेळ झालीय्; माझ्यासाठी रात्रीच्याला ते ठेवून दे." असे म्हणून तो वचावचा चार घास खाई, हातावर पाणी घेई आणि कोर्टात जाऊन आपली सावजे हेरी. बायकोला बिचारीला हे नित्याचं झालं होतं. नवऱ्याच्या सांगण्याप्रमाणे ती दुपारचं पिठलं रात्रीसाठी झाकून ठेवी.

कोर्टात जाऊन एखाद दुसरी खोटी साक्ष दिली, कुणातरी भोळ्या बापडया आश्राप अशीलाकडून थापेबाजी करून चारदोन रुपये उकळले की, धोंडो गुंडो खूष होई आणि घरी येऊन रात्री

# याची देही, याची डोळा........

— अ. अं. कुलकर्णी

पिठल्यावर निवान्त मनाने आडवा हात मारी. "शिळ्या पिठल्याची लज्जत काही और असते !" असे तो पोटावरून हात फिरवीत आवडीला म्हणे.

आवसरीचे सारे ग्रामस्थ, कोर्टातले सारे वकील झालेच तर काही 'कोर्टे' सुद्धा या अवचटाला कंटाळली होती, कधी हा थेरडा आटोपतोय् ? याची वाट पाहात होती पण धोंडो गुंडो साऱ्या अवसरीला पुरून उरला होता.

पोलीस, 'पंच' म्हणून तर धंदेवाईक गुंड 'साक्षीदार' म्हणून धोंडो गुंडोचा उपयोग करीत. काही वकिलांकडून टौटगिरीबद्दल त्याला कमिशन मिळे तर काही वकील साक्षी फ़ोडण्याबद्दल त्याला रकमा देत. एकूण त्याची कोर्टातील प्रॅक्टिस बऱ्यापैकी चाले. त्याचा बिलंदर पाजीपणा त्याच्या धंद्याला पोषक ठरे. तालुका कोर्टात तर त्याला भरपूर काम मिळेच पण प्रसंगी त्याला जिल्ह्याच्या कोर्टातही हजर राहावे लागे.

धोंडो गुंडोच्या घरी आलेल्या लोकांना बसायला तरटा-जाजमाची बैठक असे; टेकायला तक्के असत. पान तंबाखूचे तबक असे तर थुंकायला तस्त असे. त्याच्या अंगणात एक तट्टू बांधलेले असे. जवळपासच्या खेडेगावातून तसेच वाड्या शिवारातून साक्षी पुरावे गोळा करण्यासाठी आणि अंगी असलेल्या कोर्ट कचेरीच्या ज्ञानावर गोरगरीबांशी दंडेली करावयास जाण्यासाठी धोंडो गुंडो तट्टाचा उपयोग करी. वाण्या उदाम्याचे पैसे तो कधीच वेळेवर देत नसे आणि म्हणून त्याच्या दारात नित्य कोणी ना कोणी तगादा करायला येत असे. तशी त्याची परिस्थिति वाईट नव्हती. पण दारात तगादा असणे तो भूषणाचे मानी. आणि चार दोन हिसके दिल्याशिवाय कोणाचेच पैसे तो देत नसे. अशा या धोंडो गुंडोच्या आयुष्यात अपवादात्मक अशी एक बऱ्यापैकी बाब होती. दोन्ही वेळच्या जेवणाअगोदर तो बाहेरच्या दारापाशी क्षण दोन क्षण उभा राही आणि कोणी अतिथी अभ्यागत असेल तर त्याला पंक्तीला बोलावी. पंक्तीला आलेल्या अशा पाहुण्याला घरात बहुधा तयार असलेल्या पिठल्या भाकरीचा भरपूर आग्रह होई.

आवडीला त्याचे हे करणे फारसे पसंत नसे. एक तर रोजच असा अतिथी असणे शक्य नसल्यामुळे कधी कधी तिचे अन्न वाया जाई तर कधी कधी ऐन वेळी स्वयंपाक वाढवावा लागल्यामुळे तिची धावपळ होई. याबाबत तो तिला म्हणे, "तुझी भात-भाकरी एखादे दिवशी थोडी वाया गेली तर जाऊ देत पण आलेल्या अतिथीला अवचटाच्या या आढ्याखाली अन्न हे मिळालेच पाहिजे ! अग, अन्नदानासारखं पुण्य नाही. शिवाय शिळं राहिलंच तर सकाळचं संध्याकाळी खायला मी कधी कुरकूर केली आहे काय ?"

नवऱ्याच्या या खाक्याविरुद्ध आवडीचे काही चालत नसे. अन्न उरले तर ती बिचारी गाई वासराला घाली पण स्वयंपाक करताना वाढत्या हाताने करी. धोंडो गुंडोला लागणारे रोजचे पिठले करताना मात्र तिची थोडी पंचाईत होई. तरी बिचारी कधी साचे तर कधी कांद्याचे, कधी पीठ पेरून तर कधी तव्यावरचे कोरडे, कधी ताकातले तर कधी शेवग्याच्या शेंगा घालून अशा निरनिराळ्या प्रकारचे पिठले ती करी आणि नवऱ्याचे चोज पुरवी. आपल्या पतीला पिठल्याचा कधी कंटाळा कसा येत नाही? याचे तिला नित्य आश्चर्य वाटे. असा हा धोंडो गुंडो आज मरता मरता वाचला होता.

'तुला वाघानं खाल्लं मेल्या!' असे अनेक बाया बापड्यांकडून विविध प्रसंगी त्याने आजवर नुसतेच ऐकले होते. त्यांचा तो तळतळाट आज खरा होऊ पहात होता. खरोखरीचाच वाघ त्याला आडवा आला होता.

जाचक वाडीच्या पोलीस पाटलाने दिलेला महत्वाचा साक्षीदार —अगदीं आय विटनेस असलेला संभाजी, जर फोडला तर पानसे वकील अवचटाला नगद शंभर रुपये देणार होता. म्हणून धोंडो गुंडो कोर्ट सुटल्यावर अवसरीपासून तीन चार मैल असलेल्या जाचकवाडीला आला होता. संभ्या रामोशाची त्याने गाठ घेतली होती. त्या दोघांची काही हातमिळवणी झाली होती. पानसे वकीलाकडून (मिळणाऱ्या रक्कमेपैकी वास्तविक निम्मी रक्कम पण तेवढीच पानसे देणार आहे अशी बात मारून) येणारे पन्नासच्या पन्नास रुपये मी तुला देईन असे धोंडो गुंडोने संभ्यास सांगितले होते. तास दोन तास पाणी लावल्यावर संभ्या बधला होता; दिलेली साक्ष उलट तपासणीत फिरवायला तयार झाला होता. 'साक्षीच्या वेळी दिलेली जबानी खरी नाही ती मी केवळ पोलीस पाटलाच्या दमदाटीमुळे व मारहाणीच्या भीतीमुळे तशी दिली. वास्तविक मी गंग्या सुताराबरोबर सीताराम कासाराच्या सुनेला त्याच्या पडाळीत मुळीसुद्धा पाहिले नाहीं' असे तो क्रॉसमध्ये सांगणार होता. संभ्याच्या या आश्वासनाप्रीत्यर्थ त्याला तात्काळ तिथल्या तिथे धोंडो गुंडोने दहा रुपये दिले होते. आणि संभ्याने लागलीच दिवळीतल्या खंडोबाच्या साक्षीने भंडारा उचलून बाह्मनाला निर्धास्त केले होते. हरीभाऊ पाटलाचा नाही तरी संभ्याला मनातून राग होताच. क्रॉसमध्ये साक्ष उलटवली की, भडवा नीट उताणा होईल हे धोंडो गुंडोचे म्हणणे संभ्याला पटले होते आणि खरं तर पुढच्या चाळीस रुपयावर त्याचे चित्त लागले होते.






येणे प्रमाणे हरीभाऊ पाटलाची तंत्रून घोंडो गुंडो जाचकवाडीहून अवसरीस येण्यास निघाला त्यावेळी अस्तमान होऊन दोन तास झाले होते. रात्र कृष्णपक्षाची होती. रस्ता कधीच काळोखात मिसळून गेला होता. पण, 'पायाखालचा तर रस्ता आहे' या सबबीवर आणि तट्टाच्या भरवंशावर त्याने खंड्यावर टांग टाकली होती. दुपारी राहून गेलेलं शेवग्याच्या शेंगांचं पिठलं आता घरी जाऊन नीट यथास्थित हाणावं या बेतानं तो खंड्याला टाच मारून दामटीत होता. हरीभाऊ पाटलाची उद्या शिंगणे कोर्टापुढे होणारी शोभा त्याला आत्ताच दिसत होती. पानसे वकीलांकडून मिळणाऱ्या दश्याच्या दहा नोटा त्याच्या पुढे तरळत होत्या. काम फत्ते झाल्यावर संम्याच्या उरलेल्या चाळीस रुपयांना कशी टांग मारता येईल? याबाबत तो मधूनच काही शक्कल शोधीत होता. अशा एकाधिक तंद्रीत गुंतलेला धोंडो गुंडो मघल्या नदीची दरड उतरून खाली येतो न येतो तोच खंड्या कसेनुसेच खिकाळू लागला. त्याचे पाय भुईला खिळल्यासारखे झाले. कान पाडून तो थरथरू लागला. खंड्याला एकाएकी काय झालय्? थोडक्या करता हे गधडं आता अडलं कशासाठी? याचं आश्चर्य अजमावणाऱ्या धोंडो गुंडोच्या नजरेसमोर एकदम पिवळे हिरवे दोन डोळे बिजलीसारखे चमकले. नदीच्या पैलतीरावर स्वारी पाणी प्यायला आली होती. पावणेसहा फुटांच्या उंच्नीच अवचटाला दरदरून घाम फुटला. देवा शपथ खरं सांगेन खोटं बोलणार नाही अशी चक्क खोटी नाटी शपथ बडबडणारी जीभ कोरडी ठाक पडली आणि टाळ्याला चिकटून बसली. एरव्ही उलटे ठरणारे काळीज भीतीने थरकापू लागले.

"मघल्या नदीच्या रानात तुर्तास जनावर सुटलय्–बाह्यना नीट सांभाळून जा," असं बजावणाऱ्या रामोशाची बत्तीशी इतक्या लागलीच उपटूल आणि ती आपल्याच कपाळी येईल हे घ्यानीमनी नसलेल्या अवचटाने मघा निघताना मोठ्या बेफिकिरीने संम्याला सांगितले होते की, 'छे! छे! असा वाघानं खाऊन टाकण्यासाठी हा ब्राह्मण जन्माला आला नाही. अरे, आज जर मला वाघानं नेलं तर उद्या हरीभाऊ पाटलाला उलटा झालेला पाहणार कोण? आणि तुला उरलेले चाळीस छत्रपती देणार तरी कोण!' यावरही संम्यानं त्याला वाघानं गणप्या जाचकाची शेळी कालच्या रात्रीलाच ओढून नेल्याची हकीकत सांगितली होती. तरीही धोंडो गुंडोनं मोठ्या टेचात खंड्यावर टांग टाकली होती.

पण ते सारं अवसान आता संपलं होतं.

आजपर्यंत धोंडो गुंडो कोणत्याच प्रसंगाला कधीच फारसा डरला नव्हता. पण पैलतीरावरील तो अम्मळ गुरगुरणारा तेजाळ डोळ्यांचा साक्षात मृत्यू समोर ठाकताच धोंडो गुंडो अर्धा मेला झाला; धोतर पिवळं होण्याचीच काय ती बाकी उरली.

परंतु काळ आला होता पण वेळ आली नव्हती. एक घोडं आणि एक माणूस असे दोन खाद्यपदार्थ समोर असूनही वाघ





अनुक्रमणिका

जागचा हलला नव्हता. जागीच गुरूगुरून शेपटी भुईवर आपटीत होता. भरल्या पोटी पाणी पिऊन तो सुस्तावला होता की, आणि काही चमत्कार झाला होता न कळे पण जनावर जागच्या जागीच स्तब्ध होते.

मृत्युच्या भीतीचा पहिला भर ओसरल्यावर, वाघ अंगावर चालून न येता माघाराच निघून जाण्याची शक्यता अधिक हे धोंडो गुंडोने ओळखले आणि मग त्याचे चलाख डोके काम करू लागले.

घोड्यावर बसल्या बसल्याच त्याने कोटाच्या आतल्या खिशात हात घालून दोन तीन सवंध कोरे ताव बाहेर काढले, त्यांचा चुरगळा करून चेंडू केला. बाहेरच्या खिशातून डबडं काढलं. एक काडी ओढली आणि कागदाचा तो बोळा त्याने पेटवला. बोळा नीट पेटला आहे असं पाहून त्याने तो वाघाच्या दिशेने भिरकावून दिला. या प्रकाराने खंड्याहि बिचकला. त्याने खिंकाळून जागीच एकवार थयथयाट केला. धोंडो गुंडोनेहि धावारे धावा इथं वाघ आहे वाघ अशी आरोळी ठोकून मोठ्याने बोंब मारली. या सर्व गोष्टींचा एकत्रित परिणाम होऊन वाघ बुजला आणि एकाच उसळीसरसा लांघेवर पाठीमागे वळून मागच्या मागे दिसेनासा झाला.

धोंडो गुंडो विरुद्ध ड्यू असलेलं यम दरबाराचं वारंट गफलती-मुळं नीट इश्यू केलं गेलं नव्हतं हेच खरं! काळानं निष्काळजीपणा केला त्यामुळं वेळ भरली असूनही टळली!

यमराज चित्रगुप्तावर भयंकर चिडलेले होते. अवसरीच्या अवचटाचा मुडदा ड्यू असूनही कोर्टापुढे वेळेवर हजर केला गेला नव्हता. या गैरकारभाराबद्दल चित्रगुप्ताला नीट ताकीद देण्यात आली. यमराजाने केलेली भोसडपट्टी ऐकून घेऊन चित्रगुप्ताने भीतभीत यमराजांना सांगितले होते की, "महाराज वरच्या —मृत्युंजयाच्या—ऑफिसमधल्या दिरंगाईमुळे हे घडलं. आपल्या ऑफिसची या कामी कोणतीच मिस्टेक झालेली नाही." पण यमराजाने चित्रगुप्ताची कोणतीच सबब ऐकून घेतली नाही. उलट वर नीट समज दिली की, "याद राखा; इत:पर कामात जर असे काही दुर्लक्ष केलत तर तुमचे प्रमोशन थांबविले जाईल एवढेच नव्हे तर हेही लक्षात ठेवा की, काम न करता वर थापा-थापी करून मला बनविण्याचा जर पुन्हा प्रयत्न केलात तर तुम्हाला रिव्हर्ट का करू नये? असा मेमो तुम्हाला मिळेल."

साहेब आज भलताच तापलाय हे जाणून घेऊन चित्रगुप्ताने मौन पाळले.

त्याच हीटमध्ये यमराजाने टेबलावरची घंटा दोन चार वेळा बडवली. तात्काळ चार यमदूत यमराजापुढे हजर झाले.

"चित्रगुप्ताकडून पटकीच वारंट इश्यू करून घ्या आणि अव-सरीच्या अवचटाचा मुडदा उद्या सकाळी ११ वाजता माझ्यापुढं हजर करा." यमराजानं दूतांना फर्मावले.

"जी सरकार मुडदा घेऊन येतो" असे म्हणून यमदूत निघाले. दरबाराच्या दाराशी ते येतात न येतात तोच पुन्हा साहेबाने

# भारताचे नवे सरसेनापति :
# के. कुमारमंगलम्

भारताचे नवे सरसेनापति हे एका मोठ्या व राष्ट्रभक्त कुटुंबात जन्माला आले. महाराष्ट्राचे भूतपूर्व राज्यपाल व कॉंग्रे-सचे एक प्रमुख आधारस्तंभ डॉ. सुब्बारायन यांचे ते चिरं-जीव होत. त्यांच्या कुटुंबात मोठा गंमतीदार योग घडून आला आहे. बाप देशाच्या स्वातंत्र्य चळवळीत होता, तेव्हां मुलगा ब्रिटिशांच्या सेनेत नोकरी करीत होता. आणि एक मुलगा साम्य-वादी चळवळीत क्रियाशील भाग घेत होता. पहिल्या महायुद्धात भारतीय सेनेने जे शौर्य गाजविले व युरोपीय सैनिकांच्याच तोडीचे आम्ही आहोत हे सिद्ध केले, त्यामुळे ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं कांहीं भारतीयांनाही सँढर्स्ट व वुलविच येथील रॉयल मिलिटरी कॉलेज व मिलिटरी अकादमीत प्रवेश देऊन तयार करण्याचे ठरविले. भारतीय कर्तृत्वाला ते एक प्रकारचे आव्हानच होते. आणि आव्हानक प्रकृतीच्या कुमारमंगलम् यांनी ते स्वीकारले. वयाच्या १८ वे वर्षी त्याना वुलविच येथील लष्करी अकादमी-मध्ये प्रवेश मिळाला.

कुमारमंगलम् हे सुब्बारायन कुटुंबाच्या जहागिरीच्या गावाचे नाव आहे. डॉ. सुब्बारायन हे त्या गावचे जमीनदार असून कुमारमंगलम् यांचे बालपण श्रीमंतीत गेले. पण बापाने मुलांना सुशिक्षण दिले. त्यांचा एक भाऊ सुप्रिम कोर्टाचा वकील असून तिकडील एक ज्येष्ठ कम्युनिस्ट पुढारी आहे. कुमारमंगलम् यांचा जन्म १९१३ मध्ये झाला. पूर्व शिक्षण मद्रास येथे व नंतर इंग्लंडमधील ईटन येथे झाले. १९३१ मध्ये वुलविच येथील लष्करी अकादमीत त्यांना प्रवेश मिळाला व १९३३ मध्ये सेकंड लेफ्टनंट म्हणून त्यांना कमिशन मिळाले. पहिल्या भारतीय आर्टि-लरी रेजिमेंटमध्ये त्यांची नेमणूक झाली.

दुसरे महायुद्ध सुरूं झाले तेव्हां कुमारमंगलम् यांच्या तुक-डीची नियुक्ति मध्यपूर्वेत करण्यात आली. दुर्दैवाने पश्चिमी वाळवंटात लढाईची धुमश्चक्री चालूं असताना ते युद्धबंदी झाले व इटलीतील युद्ध कैद्यांच्या शिबिरात त्यांची पाठवणी झाली. परंतु तेथून त्यांनी मोठ्या हिकमतीने स्वत:ची सुटका करून घेतली. परंतु इटलीसारख्या ठिकाणी हा 'काला आदमी' किती दिवस लपून राहणार? त्यांना पुन्हां अटक झाली व त्यांचे हिक-मती डोके ध्यानांत घेऊन जर्मनांनी त्यांना जर्मनीत हलविले. तेथून मात्र त्यांना सुटणे शक्य झाले नाहीं. युद्ध कैदी होण्यापूर्वीच ज. कुमारमंगलम् यांनीं आपले धाडस व कुशलता दाखवून सैनिकी मोठेपण सिद्ध केले. बीर हशीमच्या लढाईत रोमेलने मारलेल्या मुसंडीमुळे ब्रिटिश व भारतीय तोफखान्याला तोफा टाकून माघार घ्यावी लागली. पण कुमारमंगलम् यांना जणु त्या टाकून दिलेल्या तोफा बोलावीत असाव्या. त्यांनी जर्मन






सेनेवर मुसंडी मारून तोफा हस्तगत करण्याचा निश्चय केला. आणि रात्रीच्या काळोखाचा फायदा घेऊन त्यांनी चढाई केली व तोफा परत मिळवून आणल्या. ते सापडले असते तर——पण "ग्रहांचे साह्य शूरांना" ही म्हण खोटी ठरली नसती कां? त्या धर्यशाली कृत्याबद्दल त्यांना डी. एस्. ओ. देण्यांत आली.

१९४५ मध्ये युद्ध संपल्यावर ते हिंदुस्थानात परत आले. तेंव्हापासून १९४७ पर्यंत त्यांनी 9th Independent Heavy Anti-Air Craft Regiment & 12th Independent Field Regiment of Artillery चे नेतृत्व केले. स्वातंत्र्यानंतर त्यांना देवळाली येथील Artillery School चे कमांडंट म्हणून नियुक्त करण्यात आले. १९५० मध्ये Brigadier Artillery Army Hgs. म्हणून नेमण्यात आले. १९५५ मध्ये आग्रा येथे Indian Para Brigade येथे नेमणूक झाली. १९५६ मेजर जनरल म्हणून इन्फंटरी डिव्हिजनचे सेनापतित्व केले. १९५७–५८ साली त्यांनी घेतलेल्या Imperial Defence College खास प्रशिक्षणामुळे विलिंग्टन येथील Defence Services Staff College चे प्रमुख म्हणून नेमणूक करण्यात आली. ही त्यांची नेमणूक ही अत्यंत महत्वाची होती. कारण त्या कॉलेजातच भारतीय सेनेच्या भावी अधिकाऱ्यांना युद्धतंत्र, डावपेच, सेनेचा अधिकार वगैरे बाबतचे शिक्षण दिले जाते. गेल्या भारत–पाक युद्धातल्या बऱ्याचशा बटॅलियन कमांडर्सना ते युद्धनीतीचे शिक्षण कुमारमंगलम् यांनीच दिलेले होते. नंतर ते ले. जनरल झाले. १९६३ मध्ये पूर्व विभागाचे ऑफिसर –कमांडिंग झाले. १९६४ मध्ये त्यांना **डेप्युटी चीफ ऑफ द आर्मी स्टाफ** म्हणून दिल्लीला नियुक्ती झाली. १९६५ मध्ये Vice-Chief **ऑफ द आर्मी स्टाफ** म्हणून त्यांना नेमण्यांत आले. पाक लढाईतल्या पुष्कळशा मोहीमांची आंखणी व कारवाई ही त्यांच्याच मार्गदर्शनाखाली पार पाडली गेली. जनरल चौधरीनी त्यांची आपला वारसदार म्हणून भलावण केली व भारत शासनाने ती मान्य केली.

कुमारमंगलम्' ह्या नावाबद्दल सेनेत सर्वत्र स्तुतिपरच बोलले जाते. मन आणि शरीर पोलादी असलेला हा माणूस आता नवा इतिहास घडविणाऱ्या भारतीय सेनेचा अधिपति झाला आहे. त्याचे पूर्व 'दिव्य' आहे म्हणूनच भाविकाल 'रम्यतर' होईलच होईल असा विश्वास वाटतो.

सरसेनापति कुमारमंगलम् ह्यांचे आम्ही मन:पूर्वक अभिनंदन करतो व त्यांची कारकीर्द भारताचा लष्करी इतिहास उज्वल करो अशी इच्छा व्यक्त करतो.

**—आदित्य**

---

वाजविलेली घंटा त्यांना ऐकूं आली आणि आश्चर्यचकित होत्साते ते माघारी आले.

"वेंधळेपणा करूं नका. धोंडो गुंडो इरसाल माणूस आहे. तो तुम्हाला बोलता बोलता चकवील. काही आमिषं दाखवील आणि वारंट हुकवील. रिकाम्या हातानं परत आलात तर याद राखा" अशी तंबी भरून यमराजाने यमदूतांना कामाचे महत्त्व पटवून दिले.

दुसऱ्या दिवशी यमदूत अवसरीच्या शीवेवर येऊन पोहोचले त्यावेळी सकाळचे साडेदहा वाजले होते. आपसात विचार विनिमय करून कोणत्या स्वरुपात आणि कशा वेषात धोंडो गुंडो पुढे जाऊन ठाकावयाचे आणि पटकीचा फास नेमका त्याच्या गळ्याभोवती कोणत्या क्षणी आवळावयाचा वगैरे त्यांनी पक्के केले. आणि नंतर त्यांनी त्यांचा मोर्चा धोंडो गुंडोच्या घराकडे वळविला.

इतर ग्रामस्थांना उगाच भीति वाटावयास नको म्हणून ब्राह्मण वेषात निघालेल्या यमदूतांना चौकशीअंती समजले की, धोंडो गुंडो मुंजाबाच्या वोळात पिंपळाच्या झाडाखाली असलेल्या कौलारू घरात राहात आहे. शोध करीत करीत हे चार ब्राह्मण त्या घरापाशी यायला आणि "कोणी अतिथि अभ्यागत दारी प्राप्त झाला आहे की काय?" याची चौकशी करण्यासाठी धोंडो गुंडो दारावाहेर यायला एकच गाठ पडली.

परस्पर नमस्कार झाले.

"काशीहून निघून रामेश्वरला निघालोय. पांथस्थ असलो तरी ब्राह्मण आहोत. पुढीची व्यवस्था झाली तर आनंद होईल; आशीर्वाद मिळेल." अशी पृच्छा करणाऱ्या ब्राह्मणांना धोंडो गुंडोने मोठ्या आगत्याने घरात आणले. तक्यांशी बसविले.

"आवडाबाई पंक्तीला आज काशीचे चार विद्वान ब्राह्मण आले आहेत. चार दशम्या टाका आणि पिठलं वाढवा" अशी आज्ञा अवचटानं पत्नीला बैठकीवरून फर्मावली. आणि तो मंडळीत येऊन तरटावर बसला.

आवडाबाईने मधल्या घराच्या भिंतीत असलेल्या झरोक्यातून ओटीवर बसलेल्या ब्राह्मणांकडे एकवार पाहून घेतले आणि भाकरीचे पीठ पुढे ओढून घेऊन ती भाकऱ्या थोपटायला चुलीपाशी बसली.

"मंडळी आनंद झाला आपल्या आगमनामुळं. आता दहापाच मिनिटात पाटपाणी घेतो! तसा आज मी घाईत आहे, माझी एक महत्वाची साक्ष आहे कोर्टात. आम्ही नाही असं पाहून कोर्ट आम्हाला मुद्दाम पुकारील. पण काही हरकत नाही; थोडा उशीर झाला तरी होऊ द्या. तुमच्या स्वागताच्या अन् पंक्तीच्या अलभ्य लाभापुढं आम्ही कोर्टातलं काम दुय्यम मानतो. हो; पण काय म्हणत होतात मघा? मंडळी काशीहून निघाली असून रामेश्वरला चालली आहेत नाही का? अहो दुसऱ्या श्रावणी सोमवाराला रामेश्वरी पोहोचायचं म्हणता आणि अजून पल्ला तर खूपच गाठायचाय तुम्हाला! अवघ्या तीन वारात तुम्ही रामेश्वरी पोहोचाल म्हणता?"

अशा गप्पा टप्पा होण्यांत दहापाच मिनिटं सहजच गेली.

"पाय धुवायला उठायचं; झालय् माझं" असा अम्मळ नाइलाजी आवाज झरोक्यातून आला आणि धोंडो गुंडोने मंडळींना हात पाय धुवावयाला उठविले.

यमदूतांना पिठल्याचा वेत नवीन होता. स्वर्गातले गुळमट अमृताचे सेवन करून मंडळी कंटाळली होती. शेवग्याच्या शेंगांचं खमंग पिठलं त्यांना फारच आवडलं. अवचट आग्रह करीत होता. आवडाबाई वाढीत होती आणि अतिथि मंडळी पिठल्याचा आस्वाद मनमुराद घेत होती.

आपल्याला आग्रह करणारा हा यजमान स्वत: मात्र धड जेवत नाही हे त्या यमदूतांपैकी एकाच्या लक्षात आले आणि तो अवचटाला म्हणाला देखील–"यजमान आपण का काहीच घेत नाही? आम्हालाच फक्त आग्रह करताय? यावर अवचट म्हणाला– आज सकाळपासूनच माझं पोट बरोबर नाही. दोन चार वेळा बर्हिदिशेला जाऊन आलो पण आराम वाटला नाही. शिवाय आमचं सकाळचं जेवण हे काही खरं नाही. माझ्यामागं कोर्टाची नित्य घाई लागलेली असते. आमचं खरं जेवण रात्रीचं. आत्ताच पहाना अकरा वाजले, माझं सारं चित्त कोर्टात लागलय्" असे उत्तर देऊन अवचट वाढायला आलेल्या आपल्या कुटुंबाकडे वळून म्हणाला, "पिठलं मोठं मस्त झालय्, माझ्यासाठी राखून ठेवा थोडं, मी रात्री सावकाशीनं खाईन. बरं काहो मंडळी शिळ्या पिठल्याची लज्जत काही और असते."

यावर ब्राह्मण मंडळी खदखदा हसली. अगोदरच कोर्टात जायला उशीर होणार आणि बारा टिकलीचं ॲण्ड्रुज कोर्ट मी वेळेवर हजर नाही हे पाहून मला मुद्दाम पुकारणार या भीतीने

**[पान ५५ वर]**





[पर्व ५ वे]

# अंदमान ते आनंदमान




**माझ्या मनावरून संपर्क आणि वार्ता यांचा कबजा हटला नव्हता. अधिक विचार करू लागलो तसे माझ्या कल्पनेवर विमान आरूढ झाले. खरेच, विमान वाहतूक अंदमानला सुरू झाली तर पाहता पाहता अन अक्षरशः उरले सुरले मानसिक अंतरहि फिटेल.**

## भ्रमन्ति

**अंदमान** हा भारताच्या मायभूमीचा एक तुकडा आहे असे वाटायच्या ऐवजी भारताचा तो एक अविभाज्य भाग आहे, अशी भावना रूजवणे आणि लोकांच्या मनात स्वेच्छा येणेच खऱ्या सात्मीकरणाची व एकीकरणाची खूण ठरली असती. आकाशवाणी आणि वार्ता यांची या दृष्टीनेच साकारणी केली. मायभूमि आणि जग यांचा असा संपर्क सुरू झाला. अजूनहि वर्गात नव्यानेच आलेला विद्यार्थी जसा भित भित बसावयास कोपरा धुंडाळत असतो तद्वत अंदमान वासियांची मने (आणि मतेहि) आहेत अस वाटल. संकोच एक-दम जाणारा नसतो. पण तो जावयास प्रयत्नांचे कडे उभे करावे लागते. माझ्या मनावरून संपर्क आणि वार्ता यांचा कबजा हटला नव्हता. अधिक विचार करू लागलो तसे माझ्या कल्पनेवर विमान आरूढ झाले. खरेच, विमान वाहतूक अंदमानला सुरू झाली तर पाहता पाहता अन् अक्षरशः उरले सुरले मानसिक अंतरहि फिटेल. विमानतळाला अनुकूल जागा? माझे सारे सूक्ष्म व्यक्तिमत्व त्या दिशेने निरंतर धावू लागले........वार्ता पोहोचवण्यास व मिळवण्यास एक जबरदस्त साधन..... बाहेर जावयास व यावयास द्रुतगति माध्यम,—आगमन–निर्गमनात सामाजिक आणि राजकीय श्वासोच्छ्वास व त्यात एक आवश्यक अशी डोळस जाणीव उद्‌भवण्याचा स्त्रोत,....निसर्गाचे वैभव आणि सौंदर्य मांडीवर खेळवणारे अंदमान आधुनिक संस्कारानी आणि सुधारणानी असेच उन्नत आणि आकर्षक बनत केवळ विमान वाहतुकीमुळे, जगाचे लक्ष्य बिंदू, लवकर होऊं शकले असते. एक मनाला विरंगुळा देणारे, आणि व्यक्तिमत्वाला उत्तेजित करणारे, टुरिस्ट सेंटर म्हणून अंदमानची महति विमान वाहतुकीमुळेच केवळ वर्तमान होणार होती. शिवाय परदेशातील लोकांच्या भेटीमुळे आर्थिक नफा आणि ख्याती वाढली असती तीहि फारच उपकारक ठरली असती. ठरणारी होती......

——असे कल्पनेच्या जगात भरारी मारणारे मन मी परत मातीवर उतरवले आणि स्वतःला प्रश्न केला विमानतळाला अनुकूल जागा—? पूर्वी एक विमान सर्विस होती. पण सर्विस म्हणण्यासारखी नव्हती. हवाई वाहतूक चालू झाली होती. पण केवळ पाच सहाच फेऱ्या एकंदर झाल्या. हे विमान 'कॅटलिना' जातीचे होते. वरचेवर खराब व्हायचं. अंदमानांत पाण्यावर उतरायचं. म्हणजे सारंच विपरित होते. संपर्काकरता वाहतूक नव्हती. वाहतूक वाढवणे आणि आवक–जावकीतून स्नेहाची वाढ करण्याचे प्रयोजन नव्हते. तिकडे पूर्वीच्या अंदमानच्या मुख्य कमिश्नरांचे मुळीच लक्ष गेले नाही असे नव्हे पण विमानतळ आणि विमान वाहतूक यांची योजना काही मूर्त स्वरुप धारण करू शकली नाही.





अनुक्रमणिका

—आम्ही अनुकूल जागेचा शोध घेण्यास आणि पाहणी करण्याच्या कामास जोराने सुरवात केली. तज्ञ घेतले. आस्थेवाईक नेतृत्वाची जोड दिली. अशा मंडळीत श्री. शांडील्य, (आंग्ल–ठसका 'सँडेल') मरीन इंजिनिअर, श्री. हलदर व श्री. मोहिनुद्दीन सिव्हिल इंजिनिअर, डेप्युटी कन्झर्व्हेटर, लोकसभेचे सदस्य श्री. लक्ष्मणसिंग, उपकमिश्नर श्री. शिवेंद्रसिंग इ. इ. व्यक्ति होत्या. जेवढ्या संभाव्य जागा होत्या त्यांचे निरीक्षण केले. जमिनीच्या सपाटीवर जागा नव्हत्या. पश्चिम किनाऱ्यावर उत्तरेस खाडीने विभागला गेलेला एक डोंगरमाथा होता. त्या घाटमाथ्यावर विमानतळाला उपयुक्त आणि उपलब्ध व्हावी अशी सपाट जागा मिळू शकेल असे आढाव्याच्या नकाशावरून (Survey Map) इंजिनिअर्सनी अंदाज बांधला पण तिथे समुद्रावरून जावे लागे. दुसरी वाट नव्हती. पर्याय नव्हता. म्हणजे अगदी विमानतळाच्या आरंभालाच अडखळण्याचा अ-शकून होता. तरी सगळा डोंगरमाथा पालथा घातला. विमानतळाला लागणारी २०० ते ३०० फूट रुंदीची भूमि आवश्यक होती. ती तरी लाभते काय हे पाहत होतो. या सुरवातीच्या विमानतळाला अनुकूल असणाऱ्या बाबी आमच्या प्रयत्नांना पुढे मार्ग करून देणाऱ्या ठरणार होत्या. या बाबतीत कुठे कसर राहू नये म्हणून आम्ही अधिक दक्षतेन वेध घेत होतो—आणि आमच्या लक्षात आल की, आवश्यक त्या लांबी रुंदीचा तो घाटमाथा असता तरी त्याचा आम्हास काही या कामाकरता उपयोग झाला नसता. कारण घाटमाथ्यांची किनार मध्ये मध्ये Ravine ने कापली गेलेली होती. विमानाच्या उड्डाणाला आणि अवतरणाला घाटमाथ्याची ही 'प्रकृति' मानवणारी नव्हती. वायुयान शास्त्राच्या तंत्रज्ञानी याला नक्कीच हरकत घेतली असती. म्हणून आम्हास वाटले की, ती जागा सर्व दृष्टया अनुकूल ठरून प्रयत्नांचा 'मुखडा' घोळवत असताना त्याला मंजूरीची सम साधेल अशी नव्हती.

—शेवटी जपान्यानी आपल्या तात्पुरत्या अमलात वापरलेला व बनवलेला लांबा लाईन (Lamba Line) हाच तळ वापरायचे ठरवले. इंग्रजांनी काही दिवस हाच तळ वापरला होता. या सर्व इतिहासाचाहि आम्हास टेकू वाटला. आम्ही ठरवले आणि आम्हास तसा टेकू वाटला हे खरे. पण तेवढ्याने थोडेच भागणार होते? अंदमान येथे विमानतळ असावा अस सिव्हिल एव्हिएशनचे श्री. शहा याना पटल पण खात्यातील खालच्या लोकांची नोंद दुजोरा देणारी नव्हती. 'धोका' आहे अशी नोंद होती. विमान वाहतुकीच्या बाबतीत 'निर्धोक' असा संबंधित खात्याचा अभिप्राय पडल्या खेरिज कारवाईचा 'चिखलात रूतलेला' गाडा बाहेर काढता आला नसता. काय कराव ? हा काही सामान्य अडसर नव्हता . . . . . . . . . . . . . . .

—त्यावेळेस एअर फोर्सचे मुख्य एअर मार्शल सुब्रतो मुखर्जी होते. त्यांचे बंधू रेल्वे बोर्डाचे (त्या वेळचे) अध्यक्ष श्री. शांतो मुखर्जी माझ्या दीर्घ परिचयाचे होते. मध्यस्थीचा अवलंब केला. एअर फोर्सचे मुखर्जीना एकदा जरी विमान उतरविण्यास व विमान वाहतुकीस ही जागा योग्य आहे अस वाटल तरी एक बंद कवाड उघडणार होते. प्रकरण अक्षरशः वेगात येणार होते. रंगत भरणार होती. पुढची वाटचाल सोपी होणार होती. मुखर्जीनी परवानगी दिली आणि कलकत्याचे (तळाचे) एअर कमोडर मालसे याना उड्डाण व पाहणी करण्याची अनुमति मिळाली. एक भावनात्मक दिलासा देणारा योग असा की, हे कमोडर मालसे हे केवळ माझ्या चांगल्या परिचयाचे होते. येवढेच नव्हे तर अकोल्याचे सरकारी हायस्कूल मध्ये माझे वर्गमित्र होते. मालसे यानी आस्थेन उड्डाण केल. तो प्रसंग अगदी आता आता घडल्यासारखा माझ्या डोळ्यापुढे उभा आहे. त्यानी एकदा, दोनदा–तिनदा त्या तळावर खालीवर अशा खेपा मारल्या. विमान हे जणू मालसे यांचे श्रवणेंद्रिय व स्पर्शेंद्रिय झाले होते आणि ते त्या द्वारा तळाची कांहीं 'धडकन्' होत आहे का, तळाचा 'कस' कसा आहे हे हेरत होते. भारतीय संविधानाचा तो आकाशातील आणि मी जमीनीवरचा,—असे पाईक होतो. कमोडर मालसे जमीन–अस्मानचा दुवा साधण्यात भारताच्या या भूमीचे भवितव्य उजळणार आहे या भावनेनेच आपल्या कर्तव्यांत आत्मनिर्भर झाले होते. त्यानी खात्री करून घेतली आणि चांगल्या मोसमात विमान उतरू शकत असा अभिप्राय दिला. तो अभिप्राय केवळ एका वर्ग मित्राचाच नव्हता तर देशाच्या सेवेकरता जीव धोक्यात टाकणारे कर्म स्वीकारलेल्या भारत पुत्राचा होता याला खरे महत्त्व आहे–

Trial Landing साठी विंग–कमांडरच्या हाताने विमान अंदमानच्या अंदमानतलावर अवतरले. ते सिव्हिल एव्हिएशनच्या डायरेक्टरांच्या कानावर घातले. त्यांच्या निदर्शनास आणून दिले. एअर फोर्सला अनुकूल वाटल, हे त्यांच्या मते नवल नव्हते. एअर फोर्सच्या लोकांच्या दृष्टिने जे सौकर्य होते, ते सिव्हिल एव्हिएशनच्या दृष्टीने असलेच पाहिजे, असते असे कुठे होते? दोन्हींचा हेतू, काम आणि व्याप ही सर्वस्वी भिन्न होती. नागरी

**एक 'ग्रामीण कथा'**



वाहतूक आणि लष्करी वाहतूक यात मूलतः फरक होता. म्हणून मुलकी हवाई उड्डाण–संचालकांची कबुली नव्हती. एकंदर मामला कसा 'पेश' केला असता पेच सुटेल? पुन्हा प्रश्न? होय, यक्ष प्रश्नच. शासकीय पुरुषार्थाला हे आव्हान होते. ते स्वीकारले होते. तेव्हा थबकून व हबकून जाण्याचा सवालच नव्हता. कारण विमानतळ चांगला, उड्डाणास टणक, कणखर व योग्य, तसाच विमान उतरण्यासाठी निर्वेध असे एकदा मान्य झाले की, लष्करी व मुल्की धोरणाच्या दृष्टीने अंगभूत फरक व बारकावे हा तपशीलाचा भाग होता. हे पटवावयाचे होते. सोनाराने कान टोचले, असे केल्यानेच जुळणार होते, जमणार होते. मग.....

एअर–मार्शल सोंधी याना भेटलो. त्यानी प्रत्यक्ष भेट दिल्यानेच खात्री पटली असती. त्या दृष्टीने मन वळविण्याचा हा 'उपद्‌व्याप' होता. त्यानी येण्याचे कबूल केले. त्याप्रमाणें ते आलेहि. आणि एकटेच नव्हे–तर ब्रह्मदेशातील भारतीय वकील श्री. लालजी मेरहोत्रा याना घेऊन आले. त्याना सर्व दाखविले. त्यानीहि पाहिले. शंकांचे निरसन केले. सर्व गोष्टी समजावून दिल्या. प्रसन्न वातावरणात मनमोकळे पहाणे व बोलणे झाले. त्यांच्या सर्व शंकांचे समाधान कोठेहि अधिक्षेप न होऊ देता केले. तशी दक्षता घेतली. अंदमानचा परिसर पाहून मंडळी खूष झाली. योग्य अशा पाहुणचारात व हास्यविनोदात आम्ही जे आवाहन करीत होतो, त्यांत बनवण्याचा किंवा थातूरमातूर करण्याचा आमचा प्रयत्न नाही, हे त्याना उमजून आल्याचे जाणवले. आम्हाला टेकू देणारा असाच अभिप्राय एअर मार्शल सोंधी यांचा पडला. त्या आधारावर आम्ही अहवाल सादर केला. आक्षेपाचा व विरोधाचा खुंटा हलविला गेला. पण...................

पण खालच्या पातळीवरील गौण, तांत्रिक, कागदोपत्री अडचणींचा बाऊ अजून थोडा उरला होता. संबंधिताना व्यक्तिशः भेटून, मोठेपणा देऊन, त्याना पटविण्याचा मी पुन्हाः प्रयत्न केला. सरकारी यंत्रणेत वेगवेगळ्या पातळीवर काही 'जबाबदारी' व 'संकेत' असतात. त्याना अनुसरून ती ती व्यक्ति वागत व लिहीत असते. अशा व्यक्तींना "बनवलं" किंवा "खिशात घातलं" की काम भागते, असा एक सर्वसाधारण गैरसमज आहे. तो अन्यायकारक आहे. कारण त्या त्या व्यक्तीला एकादी बाब काय आहे हे तर्कशः व वस्तुतः नीटपणे तर्कशुद्ध आणि तर्कसंगत पद्धतीने समजावून देणें जरूरी आहे. तसे झाल्याने 'वरची' आणि 'खालची' पातळी यात एकसूत्रीपणा आणता येतो–आणून घेता येतो. विमानतळाकरता माझे प्रयत्न चालू होते, त्यावेळी सदर बाब माझ्या विशेष अनुभवास आली. वरपांगी पटण्यासारखी, तशी भासणारी लुकलुकत्या विरोधाची एक धारा अशी होती की आतापर्यंत ज्या ज्या वैमानिकानी उड्डाण केले ते सर्वजण सर्वसामान्य वैमानिकापेक्षा (Average Pilot) वरच्या श्रेणीचे, पारंगत (ACE) वैमानिक होते. सर्वसाधारण वैमानिकालाही उड्डाण व उतरणे सोपे जाणारा व विमान वाहतुकीच्या दृष्टीनेही तो विमानतळ योग्य आहे, असा अभिप्राय हवा होता. कारण तशा सर्वसाधारण मुल्की वैमानिकांचाच तेथे नेहमी संबंध येणार होता. अर्थात तर्कशः व तंत्रशः त्या आक्षेपात फारसे किंवा सर्वांशाने तथ्य होतेच अशातला भाग नव्हता. कारण एकदा त्या क्षेत्रातील मुरलेल्या तज्ञांनीं प्रस्ताव संमत केल्यानंतर, त्यानी अशा सर्व गोष्टींचा विचार न करता निर्णय दिला, असे म्हणणे नुसते धाडसाचेच ठरणारे नव्हते, तर फारसे सयुक्तिकही ठरले नसते. अशा आक्षेपाला किंवा विरोधाला कौशल्याने तोंड देऊनच वाट काढणे योग्य होते. या संदर्भात एअर फोर्सच्या एका अनुभवी वैमानिकास Trial Landing साठीं पुनः एकवार पाठवावे अशी तरतूद करून घेतली. याकरता ज्या मुरलेल्या वमानिकाची नेमणूक झाली त्याचा अभिप्राय डावलला गेला नसता. श्री. मालसे याना मी ही गोम सांगितली. त्यानाहि मर्मावर बोट ठेवण्याची ही खुबी पटली. —आणि त्यानी इ. स. १९५७ साली ज्या आय. ए. एफ. वैमानिकाने आपल्या परमप्रिय दिवंगत पंडित नेहरूना सबंध भारतात जमिनीवरून, गगनांत उडवले आणि गगनातून या 'सस्य शामला' भूमिवर सुरक्षितपणे उतरविण्याचा सतत विक्रम केला अशा (Squadron Leader) ची निवड केली.



## २५ नोव्हेंबर १९६० या दिनी पहिलं विमान उतरलं

—सर्व प्रथितयश, तज्ञ व अनुभवी वैमानिकांचा अनुकूल अहवाल दिल्ली दरबारी 'वजनदार' झाला. खुद्द आकाशवाणीचा मी अंदमानातील अधिकृत बातमीदार व प्रतिनिधि होतोच. विमान वाहतूक समर्थ होण्याच्या दिशेने जी उड्डाणे झाली त्यांचे कुतुहलजनक वृत्त आकाशवाणीवरून ध्वनिक्षेपित झाले होते. जगाला आणि भारताला गति कळत गेली. या सर्वांचा प्रभाव पडला नसता तरच आश्चर्य वाटले असते. सर्व सूत्रे अशी फिरली की, परवानगी हाच पर्याय त्यातून संभवत आणि उद्‌भवत होता. अशी वेळ आली होती की, आता एवढ्यावरच समाधान मानून किंवा विसंबून काम पूर्ण होणारे नव्हते. अगदी वरच्या पातळीवरहि ही 'कथा विमानाची' ऐकवणे जरूर होते. आणि मी जेव्हां



विमानतळाच्या शोधार्थ निघालेली मंडळी

ही सर्व कथा कै. पं. पंताना निवेदिली तेव्हां त्यानी गृहसचीव श्री. वी. एन. झा याना जातीने लक्ष घालावयास सांगितले. याचीच मी वाट पाहत होतो. लगेच त्या वेळेचे वाहतूक खात्याचे सचीव श्री. एम्. एम्. फिलीप्स यानाहि भेटलो. परिणामत: प्रत्यक्ष अमलबजावणीकरता इंडियन एअर लाईन्स कार्पोरेशनने पाहणी करण्याचे ठरले व तदनुसार पाऊल उचलले गेले. कलकत्ता विभागाचे कॅप्टन उदय भानु सिंग यांच्या नेतृत्वाने तिघांचे मंडळ आले (३० सप्टेंबर १९६०). गंमत अशी की, हे मंडळ 'अंदमान' बोटीने आले. कॅ. सिंग यांचा आणि माझा पूर्वी एकदा संबंध आला होता. त्याचा निर्देश येथे समुचित ठरेल. कॅ. सिंग यांचा मध्यप्रदेशातील जिल्हा दुर्ग (ता. कवरधा) येथील राजघराण्याशी रक्ताचा संबंध होता. तालुका कवरधा म्हणजे असे की हे पूर्वीचे इस्टर्न स्टेटसपैकी एक संस्थान होते. मी दुर्गाचा कलेक्टर असतानाची ओळख निघाली. उजळली. यामुळे एक प्रकारची वांछनीय आपुलकी आली. एव्हाना १९६० चा मार्च महिना संपला. पहिल्या एप्रिलला एवढे करून 'फूल' झालो असे तर नाही ना ठरणार? पण ती पहिली एप्रिल फुलासारखी डवरली आणि खुलली. कारण पहिल्या एप्रिल रोजी जनरल सोंधी व इंडिअन एअर फोर्स याना अंदमानी जनतेच्या प्रति या अनुषंगाने पोर्ट ब्लेअर नगरपालिका, अंदमान असोशियेशन इ. द्वारा शुभ-संदेश धाडले. अखेर अंदमान येथे इ. स. १९६० च्या खुल्या हवामानाच्या (fair weather) मोसमात (ऑक्टोबर–नोव्हेंबर) वाहतूक सुरू व्हावी असा निर्णय झाला.

—आमच्या उत्साहाला उधाण आले. अंकुरलेली आशा फळास आली. इंजिनिअर हलदर यानी 'लांबा लाईन' विमानतळाला अनुरूप करण्याकरता कंबर कसली. अशी तडफ आणि जिद्द होती की, तो विमानतळ पाहून कुणीहि प्रश्न करावा 'अशा तळाकरता आक्षेप घेण्यात आले होते. ?' जोरात काम सुरू झाले. प्रिन्सिपल इंजिनिअर अयंगार आणि सुपरिटेंडिंग इंजिनिअर श्री. हलदर यानी जी विशेष मेहनत घेतली तिला 'अनुकरणीय' असे म्हटले तरच त्याची यथार्थ कल्पना येईल. ३० ऑक्टोबर रोजी पहिली विमान वाहतुकीची फेरी व्हावी असा इंडिअन एअर लाईन्स कार्पोरेशनचा मानस होता. तशी तयारी झाली आणि पुन्हा कुठेतरी माशी शिंकली. काय झाले कळेना. उमजेना. तेव्हा मी विमानतळ सर्वतोपरी 'तय्यार' आणि 'जय्यत' असून आता विलंबाचे कारण नसावे हे पटवून देण्याकरता एअर मार्शल मालसे यांच्याशी रद्दोबदल करून ठरलेल्या तारखेला ३० ऑक्टोबर रोजी एअर फोर्सचे का होईना विमान आणवले. उतरविले. त्यानी विमानतळ सर्वतोपरी योग्य व चांगला झाल्याचे स्पष्ट व ठाम मत व्यक्त केले. याचाच परिणाम म्हणून एअर लाईन्स कॉर्पोरेशनचे पहिले सर्व्हीस विमान कलकत्त्याच्या वृत्तपत्र प्रतिनिधीना आणि मला घेऊन ता. २५ नोव्हेंबर १९६० या दिनी उतरले. अंदमानच्या इतिहासांत हा शुभदिन झाला! सकाळी सहा वाजता आम्ही निघालो आणि साडेनऊला रंगूनला उतरलो. आणि दुपारच्या जेवणास पोर्ट ब्लेअरला कलकत्त्याहून एकूण साडेसहा तासात आलो. या विमान फेरीचा सर्वांच्या दृष्टीने एक स्फूर्तिदायक विशेष सांगण्यासारखा आहे. विमानात एअर हॉस्टेस कुमारी गुप्त हिला मी विचारले कीं, प्रवाश्याना जी त्या दिवशीची वृत्तपत्रे वाचावयास दिली त्याचे काय करणार? तेव्हा ती उत्तरली कीं, ती रद्दीत जाणार. मी ती सर्व वृत्तपत्रे घेतली आणि विमानातून उतरताना ती माझ्या हातात जणू संदेश पत्रे म्हणून फडफडली. फडफडताना मी उद्गारलो 'अंदमानकरांनो आज येथें नुसते विमान उतरले नाही. तुमच्या जीवनात प्रथमच आजचे वर्तमानपत्र आजचा समाचार घेऊन सहर्ष तुमच्या समाचारास आले आहे. आजच नाही तर आता वाहतूक सुरू झाल्यावर हे नेहमीचे वार्तागान ठरणार–या गानात रंजन आहे, जाग आहे, शिक्षण आहे, सांधणारा दुवा आहे– मजबरोबर आलेल्या पत्र प्रतिनिधीनी आणि उपस्थितानी टाळ्या वाजवल्या. एका अभूतपूर्व उत्साहाचा झरा स्त्रवू लागला —बेटांच्या इतिहासांत पहिल्यादांच त्या दिवशीची कलकत्त्याची ताजी दैनिक वृत्तपत्रे मिळण्याचे विमान वाहतुकीमुळे शक्य झाले. पं. नेहरुनी वृत्तपत्राना, जगाकडे पाहण्याची 'खिडकी' म्हटले आहे. ती 'खिडकी' अंदमानकराना आता उपलब्ध झाली होती. माझ्या वैयक्तिक दृष्टीने या पहिल्या अंदमानच्या विमानफेरीचा संस्मरणीय विशेष असा की, या विमानाच्या वैमानिकाबरोबर (कॅ. उदय भानू सिंग) जे दोन सह वैमानिक होते त्यात माझे एक धाकटे बंधू कॅ. नारायण राजवाडे होते. कॅ. नारायण राजवाडे यांची खास नियुक्ति इंडिअन एअर लाईन्स कार्पोरेशनच तत्समयीच जनरल मॅनेजर व माझे एक वेळच सहाध्यायी एअर कमोडर पी. सी. लाल यानी केली होती.

अंदमानला विमान वाहतूक सुरू होण्यात आणखीन एका विधायक बाबीचा पाया घातला गेला. आज जगातील माणसे बुद्धीने आणि तंत्राने जवळ आली आहेत. पूर्वीच्या मानाने प्रवास करण्यावरची बंधने नुसती सैल झाली आहेत असे नव्हे तर


अनुक्रमणिका

प्रवासाची वृत्ति आणि प्रवास करणाऱ्यांचे प्रमाण खूपच वाढले आहे. शक्य असेल त्या प्रमाणे आयुष्यात एकदा तरी जगाचा फेरफटका नाही तरी निदानपक्षी मुख्य मुख्य ठिकाणे आणि सौंदर्य स्थळे पाहून यावीत असे वाटणारे आणि त्याप्रमाणे बाहेर पडणारे विशेषतः नाताळात आणि उन्हाळ्यात मोठ्या संख्येन दिसतात. जगभर या दृष्टीने प्रत्येक राष्ट्राने आपल्या देशातील टुरिस्ट सेंट-र्सची योजना आणि रचना केली असून वेळ वाचवण्याचे हमखास साधन म्हणून विमान वाहतूक आणून व कायम करून घेतली आहे. अंदमानला विमान वाहतुकीने जो विधायक पाया घातला गेला असे मी म्हणतो त्याचे कारण अंदमानचे टुरिस्ट सेंटर म्हणून महत्व शतगुणित होणारे होते. अंदमान हे टुरिस्ट सेंटर म्हणून कसे क्षम आहे आणि विरंगुळ्याचे एक चांगले धाम कसे आहे याचे विवेचन लवकर 'नंदनवन' ह्या प्रकरणात मी करणारच आहे. परन्तु येथे एका गोष्टीचा निर्देश केलाच पाहिजे आणि तो असा की टुरिस्ट सेंटरला विमान वाहतूक असण्यात त्या त्या प्रदेशाचा आर्थिक व सांस्कृतिक लाभ होतोच पण देशाला कांहीं प्रमाणात परकीय चलन मिळत जाते. अंदमान येथील विमान वाहतुकीने हे पाहता पाहता कितीतरी पटीने सार्थ करून दाखवले. जून १९६१ पावेतो विमान वाहतूकीचें आकर्षण व लोकप्रियता अशी वाढली की, लोकाना आपली विमानातली प्रवासाची जागा रिझर्व होईल किंवा नाही याची नेहमी खात्री वाटेना, कारण विमानात फक्त अठरा उतारूंचीच सोय होती. याचाच शेवटी परिणाम असा झाला की ज्याला 'वेटिंग लिस्ट' म्हणतात ती अस्तित्वात आली. इ. स. १९६० साल पासून विमानाने प्रवास करणाऱ्यांचा आलेख नजरेखालून घातला तर असे आढळून येते की, त्यांची संख्या उत्तरोत्तर वाढून डाकोटा विमान अपूरे पडू लागले. आणि या वर्षीच्या मे पासून 'स्कायमास्टर' सारख्या मोठ्या विमानाची आवक जावक सुरू झाली. हे विमान कलकत्त्यापासून पावणे तीन तासात अंदमानला पोहोचते. 'अहो, विचार काय करता हे पाहा अंदमान आले' असे गप्पात रंगलेल्या वा गुंगलेल्या सहउतारूला म्हटले तर ते मुळीच कपोलकल्पित नव्हे. अगदी मुंबईहून जेवढ्या वेळात माणसे दररोज पुण्यात जातात-येतात त्याच्यापेक्षा कमी अवधीत भारतीय आपल्या अंदमानवासिय बंधूना किंवा अंदमानवासिय आपल्या भारतीयबंधूना भेटू शकतात. 'पाहता काय, हे पाहा अंदमान'—अस्से झाले !

विमान वाहतुकीमुळे एक अभूतपूर्व आणि अविस्मरणीय घटना अंदमानचा इतिहास बनली हे खरे. पण अंदमान खऱ्या अर्थाने भारताच्या नकाशात महिमान्वित व्हावयाचे असल्यास अंदमानची सुप्त–गुप्त शक्ति शोधणे आणि राबवणे अत्यंत आवश्यक होते. ज्या जमिनीवरची माणसे व आम्ही काही संदर्भात एकत्र येऊन व एक होऊन काम करत होतो ती जमीन तशी अभ्राप होती. सुजलाम होती. तिला अक्षरशः 'सस्य शामलाम्' आणि 'सुफलाम्' करावयाची तर तिच्यात आणि तिच्या उरावर आणि तिच्या पोटात काय काय दडलेले आहे, याचा परिचय करून घेणे आणि सलगी साधणे आवश्यक होते. निसर्ग लुटूनहि संपन्न करता येतो याची दिशा आणि पद्धत मानवी विज्ञानाने दाखवलेली आहे. मला सहज असे वाटते की, जिथे माणसे यावयासच कचरत आणि जी आलेली होती ती काही आपल्या स्वखुशीने आलेली नव्हती. तिथें प्रकृतीचे अंगीभूत वैभव आणि सामर्थ्य कुणी मुळी पाहिलेच नसावे. मग तिचा उपयोग आणि फायदा एकंदर विकासाकरिता करून घेण्याचा प्रश्न दूरच राहिला. त्या विचाराने माझ्या पायात जणू चक्र बसवले आणि सगळी अंदमान बेटें मी पायाखाली घातली.

तसे करताना मनात अग्रक्रम होता, तो लोकवस्तीसाठी



**अनेक नवीन धक्के बांधले त्यांतील एक**

सोयीस्कर व अनुकूल परिसर धुंडाळण्याचा; दळणवळणाकरिता मोठे रस्ते तयार करण्यासाठी मोक्याच्या जागा ठरविणे अशा स्वरूपाचा. रस्त्यांमुळें व्यापार–उदीम व आदान–प्रदान वाढले असते. विद्यमान बंदरें अद्यावत करण्यासाठी बेटांतून तसा अवसर शोधणे. त्यानुसार जेटींची बांधणी, पर्यटकांच्या (Tourist) दृष्टीने लक्षणीय व मनोहारी स्थळे निर्माण करणे, सागाचे जंगल वाढविण्याकरितां योग्य भूमी; आदिवासीना टिकविणे व फुलविणे इ. इ. अनेक कल्पना उराशी घेऊन खूप हिंडलो. पुष्कळ फिरलो. पायी, बोटींतून, जसे हवे तसे. आयुष्यात इतका व असा चक्रीवीर झालो नव्हतो. पण मजा अशी की कधीही उबग जाणवला नाही. कंटाळाही आला नाही. कार्याची ज्योत सदा तेवत ठेवण्याचे सूत्र असे सांगतात की, एक गेला की, दुसऱ्याने ती पाजळत ठेवावयाची. ती मालविता कामा नये. माणसाच्या व्यक्तिमत्वातील नानाविध पैलूही त्या अर्थाने ज्योतीच असतात. चैतन्यमय व्यक्तिमत्वाचा (Dynamic Personality) हाच आशय असावा. संकल्प आणि कर्म यांच्यात प्रकाशाने उजळणारा दिवा अशा ज्योतीचाच असला पाहिजे. म्हणूनच कण न् कण कर्माने पेटून निघतो. स्वतःला 'कर्मयोगी' आदि अवडंबरे लावून घेणे मला प्रशस्त वाटत नाही. पण अंदमान येथील भ्रमंतीत व कार्यात काही अपूर्व जोश आला. कामाने काम वाढले. आणि वाढत्या कामात कृतार्थताच नव्हती; तर जीवनाची भमिका उन्नत होत असल्याचा प्रत्यय येत होता—आलाही. संचाराला शक्तिचा असा प्रचंड स्त्रोत लाभला.

—आणि हे फिरणे मुळीच वाया गेले नाही. माझ्या मनांत रचनेच्या दृष्टीने गोष्टींचा जो क्रम होता, त्यात भरच पडली. तशा काही गोष्टी अंदमानच्या मातीत आहेत असे स्थूलमानाने वाचण्यात व श्रवण्यात आले होते. पण मातीत असलेले, मातीच्या अंगात यावयास मानवाचा विज्ञानपूत हात फिरावा लागतो. भ्रमंतिमधे माझ्या अस लक्षात आले की मध्य अंदमानच्या "रंगत" बेटात कोळसा व लोखंड यांच्या खाणींचे अस्तित्व आहे. "बाराटांग" तसेच "हॅवलॉक" बेटात तेल किंवा गॅसची प्राप्ति होऊ शकते. गंधकाची आशा "बॅरन" बेट लावीत होतें. रबरसाठी 'रटलँड', व मध्य–निकोबारचे 'काचाल' बेट इ. इ. उत्पादनक्षम जागा आढळल्या———

**( क्रमशः )**

कुत्रे उन्मत्त होऊन नाचत होते....मांगाचा चिंधड्या झालेला देह
क्षिप्रेच्या कांठीं निर्जीव होऊन पडला होता....
बलराम उस्ताद म्हातारपणी नेहमी ही गोष्ट रंग भरून
सांगायचा क्षिप्रेकांठीं मांगाचं राज्य आहे....




जितेंद्र अभिषेकी

**वंतासिंगाच्या** वायकोन चावडून फेंकून दिलेली वकऱ्याची टांग बिवळी चघळत बसली होती. चघळण्यावरोबर तिची ती चित्त्यासारखे ठिपके असलेली पाठ सुताराच्या भात्यासारखी मागंपुढं सरकत होती. पुढच्या दोन पायांत टांग गच्च पकडून बसलेली बिवळी मागून पहाणाऱ्याला गाईचं नरडं हां–हां म्हणतां फोडणाऱ्या चित्त्याची आठवण करून द्यायची. सुळ्यासारख्या असणाऱ्या दातांच्या मुळांतून रक्त फुटत होतं. पण बिवळीला पर्वा नव्हती. पुष्कळ वेळ बिवळीचा हा प्रयत्न चालला होता. टांग फुटत नव्हती. आणि जमिनींत रुतून बसलेली बिवळी टांगेवरची आपल्या सुळ्यांची पकड सैल सोडायला तयार नव्हती. साला बकरा जुनाट होता. त्याच्यासारखीच टांग देखील मट्ठ बनली होती. वंतासिंगाच्या बायकोनं हैराण होऊन फेंकून दिली. कुत्रीच्या समोर. नेहमी वंतासिंगाची बायको बिवळीच्या चिवटपणानंच तंगडी फोडायची. कधीं तरी असला हाडीं मुरलेला बकरा आला की, वंतासिंगाची बायको स्वतःला न तुटणारी टांग बिवळीपुढं फेंकून द्यायची. आणि अर्जुनाच्या झाडाखालीं बसून असली तंगडी बिवळी तटातट् फोडायची.

प्रयत्न करूनहि मेलेल्या बकऱ्याची टांग दाद देत नाही असं पाहून चिडलेल्या बिवळीनं गुरगुरून ताड्कन् आपले मागचे पाय जमिनीला आपटून पुन्हां एकदां तंगडीला घांस मारला, आणि बिवळीनं तटातट् फोडलेल्या त्या जून जनावराच्या टांगेकडे पाहून वंतासिंगाची बायको मेलेल्या बकऱ्याला हंसली. तुटलेल्या टांगेंतला गर बिवळीनं बकावका खाऊन टाकला.

देवासजवळचं गांव तें. क्षिप्रेच्या कांठावर असलेल्या त्या गांवांतून मोकाट सुटलेल्या कुत्र्यांचे थवेच्या थवे माणसाच्या अस्मितेला कःपदार्थ लेखून मन मानेल तसे फिरत असतात. गढवाली वंतासिंगानं त्या गांवीं स्थायिक होतांना आपल्याबरोबर एक कुत्री आणली होती. वंतासिंगाप्रमाणंच उलट्या काळजाची, थंड्या रक्ताची. नरड्याची हांव धरणारी. कोणत्याहि माणसाच्या किंवा जनावराच्या पोटऱ्या फोडण्याची इच्छा असलेली. क्रूरपणांत वंतासिंगाला आणि त्याच्या राकट बायकोलाहि लाजवणारी. हस्ताचा पाऊस पडूं लागला होता. पहाणाऱ्याची छाती फोडणारा पूर क्षिप्रेला आला होता. आणि बिवळीला क्षिप्रेसारखंच तारुण्याचं उधाण आलं होतं. फोडलेली तंगडी बाजूला फेंकून बिवळी नाचूं लागली. तंगड्या ताणून इकडे तिकडे पाहूं लागली. आपल्या मांसानं भरलेल्या गच्च पाठीवर फाड्फाड् शेपटीचे फटकारे मारूं लागली. गुरकूं लागली. केकाटूं लागली. आणि आसपास जमलेल्या पंधरावीस कुत्र्यांच्याकडे पाहून उपेक्षेनं भुंकूं लागली. त्या पंधरावीस कुत्र्यांचे हावरे डोळे बिवळीच्या फुटून पडणाऱ्या तारुण्याकडे वीतभर जिभा बाहेर काढून पहात होते. बिवळीच्या नसांनसांतून झिरपणाऱ्या तारुण्याकडे वखवखलेल्या नजरेनं पहात होते. पण हें सर्व बिवळीपासून स्वतःला इजा पोंचूं न देण्याइतपत लांबून चाललं होतं. त्या सर्व नर कुत्र्यांपेक्षां बिवळी थोराड दिसा-











यची. चरबीनं आणि मांसानं पुरेपूर भरलेली. जात्याच आक्रमक आणि माजलेली. तिचे डोळे नेहमीं आग ओकायचे. मांसाच्या तुटून पडणाऱ्या गोळ्यासारखी जीभ तोंडांतून लोंबायची. आसपास जमलेल्या त्या पंधरावीस कुत्र्यांकडे बिवळीनं एकवार गुरकावत पाहिलं. आणि त्यांत आपल्या तोडीचा कुणी नाही, असं पाहून तिनं मागल्या पायांनीं भसाभस माती उकरून गर्वानं त्या कुत्र्यांवर फेंकायला सुरुवात केली. त्या पंधरावीस कुत्र्यांपैकी एकानं थोडीशी धिटाई करून बिवळीच्या रोखानं झेंप घेतली. पण तो कुत्रा पुढयांत पोंचण्यापूर्वीच बिवळीनं तीरासारखी झेंप घेत त्याची मानगूट अशी कांही जोरांत पकडली, की कशीबशी बिवळीच्या दातांची जीवघेणी पकड सोडवून घेऊन तो कुत्रा केकाटत क्षिप्रेच्या कांठावरून पळत सुटला. बाकीचे कुत्रे पाय पसरून अजूनहि उपाशासारखे बिवळीच्या रोखानं पहात होते. आणि बिवळी पुढच्या तंगडयांनीं आपलं तोंड घांसून-पुसून स्वच्छ करण्यात गुंतून गेली होती.

पावसाच्या दिवसांत संध्याकाळचे चार वाजले की, मांग क्षिप्रेच्या कांठीं हळूंच वर येणारे सावे-खेकडे पकडण्यासाठी फिरायचा. क्षिप्रेच्या कांठाकांठानं असाच फिरत असतांना लांबून वाऱ्याबरोबर माज आलेल्या कुत्रीचा त्याला वास आला. मांगानं कान टवकारले. नाकाच्या पुडया फेंदारल्या. आणि तोंडांत असलेला खेकडा बेहोष होऊन काटकन् फोडला. फुटलेला, तडफडणारा खेकडा तसाच फेंकून देऊन मांगानं वास येणाऱ्या दिशेकडे धांव घेतली. वैराण नदीकांठावरून मांग धांवत सुटला होता. खून चढल्यासारखा. बलात्काराच्या गुर्मीनं. मदांध होऊन मांग धांवत होता. झटक्यांत त्यानं झेंप घेत-घेत डोंगर ओलांडला. कपारी आणि उघडे बोडके खडक मागं टाकून मांग गांवच्या वेशीवर यऊन थडकला.

बंतासिंगाच्या घरासमोर बिवळी सुस्त होऊन पडली होती. काळ्या मातींत लोळत होती. क्षणांत तिचा केकाटणारा आणि गुरगुरणारा आवाज आसपास घुमत होता, तर क्षणांत कुत्र्यांची ती राणी स्वयंवरासाठीं आमंत्रण पाठवत इकडून तिकडे धांवत होती. बंतासिंगाची बायको आपल्या तारुण्यांतल्या असल्याच गोष्टी आठवत-आठवत मांडलेल्या दगडावर बसून भांडीं घांसत होती. भांडीं घांसता-घांसतां बिवळीच्या त्या थयथयाटाकडे पाहून "बत्तमीज, बहू होके शरमाती भी नहीं" असं कांहींतरी कौतुकानं बडबडत तिनं पुन्हां आपल्या कामाला सुरुवात केली.

मांग एका कपारीवर खडा होता. त्याचे केंस ताठ उभे राहिले होते. शेपूट नाचूं लागलं. तोंडांतून लाळ गळूं लागली. आधींच लाल दिसणारी त्याची जीभ दीड वीत बाहेर आली. डोक्यांत रक्त चढत चाललं होतं. डोळे आंधळे होत चालले होते. रक्तानं भरले होते. पोटाखालचा भाग फुगत चालला होता. आसपास एकवार तुच्छतेनं पाहून मांगानं वाघाच्या संथपणानं चालायला सुरुवात केली. त्यानं तोंडांत सांचलेला फेंस तोंड हांसडून फेंकून दिला. आणि बिवळीकडे पहात पहात मांग तसाच पुढं सरकूं लागला.

बिवळीला हवाहवासा वाटणारा कुत्र्याचा वास कुठून तरी आला. झटक्यांत ती उठून उभी राहिली. रजस्वलेचा डोंब तिच्या देहांत थैमान घालूं लागला. आग पेटत चालली होती. मांग तिच्यापासून दहा पावलांवर खडा होता.

बि‥ळीच्या आसपास गोंडा घोळणाऱ्या त्या पंधरावीस कुत्र्यांकडे द्वेषानं पहात त्यानं चित्याच्या तिडिकीनं, असहाय्यतेनं गुरगुरणाऱ्या त्या कुत्र्यांच्या थव्यावर हल्ला चढवला. पूर्वी मांगाच्या हल्ल्याचा तडाखा मिळालेले कुत्रे आधींच पळून गेले. कांहींनीं प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला आणि स्वतःचे लचके तोडून घेतले. एकच कल्लोळ माजून राहिला. बंतासिंगाची बायको कांहींहि घडत नसल्याप्रमाणें घरांत निघून गेली. थोडया वेळानं शांत झालं. फक्त दोनचार कुत्र्यांच्या अंगावरचे केंस मांस नि रक्तानं काळी जमीन भरून गेली.

दिमाखानं मांग बाकीच्या कुत्र्यांना घालवून देऊन रक्तानं माखलेलं तोंड स्वच्छहि न करतां परत फिरला.

बिवळी त्याचं शौर्य मुकाटयानं मानून घ्यायला तयार नव्हती. मांग हल्ल्याच्या पल्ल्यांत येतांच तिनं तोंड फेंदारून मांगावर हल्ला चढवला. पण तिला माहित नव्हतं, कीं मांग ही कुत्रीला झालेली लांडग्याची औलाद होती. मांगाची आई गांवठी होती. पण एका लांडग्यावर आषक झाली आणि गांव सोडून कितीतरी दिवस त्या लांडग्याबरोबर विंध्याच्या घळींतून फिरत होती. आणि एक दिवस एक कुत्र्यासारखं दिसणारं पिल्लू घेऊन गांवांत परत आली. हाच तो मांग. कुत्र्याची बुद्धि आणि लांडग्याची ताकत आणि क्रौर्य असलेला. बिवळीसारख्या कितीतरी माद्या त्यानं लोळवल्या होत्या, खेळवल्या होत्या, आणि गाईसारख्या दुबळ्या करून आपल्या मागं फिरवल्या होत्या. बिवळी अंगावर कोसळतांच मांगानं सराव असलेल्या रानवटाप्रमाणं बाजूला होऊन बिवळीला जबडयांत पकडलं आणि असा जबरदस्त हिसडा दिला, कीं पाठीचा कणा ढिला



ही एक श्लील (?) कथा

झाल्यागत बिवळी हवकली. वावरली. आणि असहाय्यतेनं केकाटायला लागली. वंतासिंगाच्या वायकोनं विवळीच्या गढवाली आईवापांचा उद्धार करतां-करतां लाजेपायीं घराचं पुढचं दार लावून घेतलं. आणि परोठयाचं पीठ कालवत ती त्या दोन्ही कुत्र्याकडे पुढच्या अपेक्षेनं दाराच्या फटींतून पहात वसली.

मांगानं कांहीं वेळानं विवळीला सोडून दिलं आणि तो तसाच तिच्याकडे पहात उभा राहिला, दरा यानं, हवकानं आणि स्वामित्वाच्या दिमाखानं. आतां विवळी त्याच्या पुरी कह्यांत येत चालली होती. तिनं उभं राहात गुलामासारखं शेपूट हलवायला सुरुवात केली. आपल्या तोंडानं मांगाचं तोंड हुंगायला सुरवात केली. घाम फुटलेलं त्याचं अंग ती चाटायला लागली. मांगाच्या केंसाळ शरीरांतून पसरणाऱ्या वासानं विवळी मऊ पडत चालली होती. विकत घेतल्या-सारखं तिच्याकडे दुर्लक्ष करून मांग क्षिप्रेच्या तीराकडे तोंड फिरवून चालूं लागला. बिवळी गुलामासारखी त्याच्या-मागून उड्या टाकत निघून गेली.

वंतासिंगाची बायको घरांत शिव्या देत परोठे भाजत होती. तिला आपल्या पूर्वा-युष्याची आठवण झाली. तीहि अशीच गढवालमधल्या आपल्या गांवाहून वंता-सिंगाबरोवर पळून आली होती. वंताच्या प्रचंड देहावर भाळून. त्याच्या वेडर वृत्ती-वर भाळून. तेरा मुडदे आणि दहा बलत्कारांचं ऐश्वर्य त्याच्या पाठीशीं होतं. विंध्याच्या कडीकपारींतून दिवसां लपून राहाणारा वंता कधींतरी रात्रीं घरीं यायचा. तोहि प्यालेला. कुणातरी बाईची अब्रू छिनून येऊन खाटेवर लोळत पडायचा. बायकोकडे ढुंकून देखील पहा-यचा नाहीं. नवऱ्यानं उपाशीं ठेवलेली ती बाई मांग व बिवळीकडे भुकेल्या इच्छेनं पहात होती. विचार करतां-करतां तिच्या डोळ्यांसमोर वंतासिंगा-एवजीं मांग दिसूं लागला.

धड कुत्राहि नव्हे व धड लांडगाहि नव्हे असा मांग. मांगानं त्या आसमंतांत एक प्रकारचा दरारा निर्माण केला होता. मांगाची आई होती एका शेतकऱ्याची गांवठी कुत्री. कळपांतून घालवून दिलेल्या एका एकांड्या लांडग्यापासून तिला हा मांग झाला. आईची वेडर वृत्ति आणि वापाची शक्ति आणि क्रौर्य व कावेवाज-पणा मांगाच्या शरीरांत पूर्णपणें उतरले होते. आपल्या आईच्या मालकाला मांगानं कधीं मानलं नाहीं. काठी उगारून मारायला आलेल्या त्या शेतकऱ्याचं मनगट मांगानं आपल्या दातांनीं कुरतडून टाकलं होतं. सातऱ्यांतल्या वत्तीसशिरा-ळयाला पुष्कळसे खून करून एक मांग देवास संस्थानांत आसरा घेऊन राहात होता. त्याला लोक मांग या नावानंच ओळखत. त्यानंच या कुत्र्याला मोठं केलं. मांग गेल्यानंतर लोक ह्या कुत्र्याला पण, त्याच्या कर्मामुळं, मांग म्हणूं लागले. मांग गावांत कुणालाहि मानत नसे, जसं माण-साला तो आपल्या सांवलींत देखील उभं राहूं देत नसे, तसाच विंध्याच्या जंगली प्राण्यांत पण मिसळत नसे. वेफाट वाढ-लेला त्याचा देह पाहून इतर कुत्रे मांगाला घावरत. तें तसे घावरले नाहींत, तर मांग त्यांना नरम आणत असे. गावांतील कांहीं कुत्र्यांच्या तंगड्या त्यानं सांध्यांतून निखळवल्या होत्या, तर कुणाच्या शेपट्या तोडल्या होत्या. कांहींना त्यानं जन्माचं लंगड करून ठेवलं होतं. कांहींचे कान फाडून टाकले होते. मांग गांवांतून पेहेल-वानाच्या दिमाखानं फिरत असे. मांग गांवांत शिरला कीं वाकीचे सगळे कुत्रे शेपट्या मारून मागल्या दारीं लपून बसत. गांवांतली माणसं देखील मांगाच्या सहसा वाटेला जात नसत. कारण क्षिप्रेच्या कांठीं मांगाचं राज्य होतं. आणि गांवच्या माणसांना नेहमीं एकटं दुकटं क्षिप्रेचं पाणी आणण्यासाठीं जावं लागत असे. माणसाची ताकत जाणून मांग पण त्याच्या आसपास राहात नसे.

मांग लहानाचा मोठा झाला कमाल हुसेनच्या शेतावर. आणि नंतर त्याला मराठी मांग भेटला. कमाल त्याला प्रेमानं वाढवायचा. पण कमालविषयीं मांगाला कधींच प्रेम वाटलं नाहीं. कमाल मरेपर्यंत त्याला कधीं मांगानं प्रामाणिकपणा दाख-वला नाहीं. मांग मोठा झाल्यानंतर त्याची आई त्याचा पहिला वळी उरली. कमा-लनं टाकलेल्या एका मांसाच्या तुकड्या-वरून भांडण होऊन मांगानं आपल्याच आईची नरडी फोडली. आणि त्या दिवसा-पासून मांगाला कमालनं हांकलून लावलं.

विष्णू मांगजवळ कांहीं दिवस हा दुसरा मांग त्याच्याच कडवेपणानं राहात होता. दोघंजण एकमेकांना जपत. पण नंतर विष्णूला पोलिस वेड्या ठोकून कुठंतरी घेऊन गेले. आणि हा मांग क्षिप्रेच्या कांठीं आपला दिवसरात्र पडून राहूं लागला. भूक लागली कीं क्षिप्रेच्या कांठी खेकडे पकडून खायच व तेहि न मिळाल्यास गांवांत येऊन एखाद्या कुत्र्याच्या तोंडचा घांस हिसकावून घ्यायचा. अशा तऱ्हेनं गेलीं कितीतरी वर्षं मांग जगत होता.

दोन दिवसांनीं बिवळी घरीं परतली. झुपकेदार शेपटीचे केंस तोडून टाकलेली. एक पाय निकामी झालेली. तोंडावर आणि अंगावर कितीतरी जखमा झालेल्या अवस्थेंत विवळी दारांत स्वस्थ पडली होती. वेदना होत असतांना देखील आंतली भूक शांत झाल्यामुळें तिच्या डोळ्यांत समाधान दिसत होतं.

मांगाची तऱ्हाच क्रूर आणि राक्षसी होती. माज आलेल्या कुत्रीला तो आपल्या मागं फिरवायचा आणि सर्व कांहीं होतांच त्याचा जातिवंत क्रूरपणा जागा व्हायचा. मागं–मागं फिरणाऱ्या कुत्रीचा त्याला कंटाळा यायचा. उवग येऊन तो मागं फिरणाऱ्या कुत्रीवर हल्ला चढवायचा. आणि एकतर तिला मरेपर्यंत फाडून टाका-यचा किंवा तशीच दणकट कुत्री असली तर ती प्रतिकार करून मांगाच्या तडाख्यांतून सुटून पळून जायची. किती तरी माद्यांची आंतडीं मांगानं क्षिप्रेच्या कांठीं लोळवलीं होतीं. कितीतरी माद्यांचे

( पृष्ठ ४९ वर पहा )








# पुनवेची रात

—चार दिवस-चार रात्री-मोहरलेले दिवस-डंवरलेल्या रात्री.... सुगंधाने भारलेल्या. उन्मादाने ओथंबलेल्या. प्रीतीच्या वर्षावात भिजून चिंब झालेल्या....तो सुगंध—तो उन्माद....

--शंकर इनामदार

**पंचप्राणांच्या** ज्योति उजळून प्रेमाची कुवंडी ओवाळून अद्वैताच्या धुंदीत दिवाळी विराम पावते. चार दिवस. चार रात्री. मोहोरलेले दिवस. डंवरलेल्या रात्री. सुगंधान भारलेल्या. उन्मादानं ओथंबलेल्या. प्रीतीच्या वर्षावांत न्हाऊन निघालेल्या. भिजून चिंब झालेल्या. तो ओलावा अजून सुकतो आहे. तो सुगंध अद्याप दरवळतो आहे. तो उन्माद आजही पाझरतो आहे. आजच्या दिवसानं तोंड फिरवलं आहे. आज सिंहावलोकन चालूं आहे. चार दिवसांतल्या चार रात्रींतल्या उन्मेषांचं क्रमवार सिंहावलोकन. एक पुष्पमाला. रंगीबेरंगी फुलांची. गुलाबाची, मोगऱ्याची, जाईची, जुईची, प्राजक्ताची, चांफ्याची, सायलीची, मालतीची, मरव्याची अन् झेंडूचीसुद्धां फुलंच फुलं. अनेक स्मृतिंची. अनेक कृतिंची. एकाजवळ एक. दाटी-वाटीनं जमलेली. ओवली गेलेलीं. गळेपडूं पुष्पमाला. चकचकणारी. लुकलुकणारी. समाधानाच्या कलाबूतानं सजलेली. हीच आज घालायची गळ्यांत. संध्याकाळीं. सूर्य मावळेल तेव्हां. डोंगराआड जाणाऱ्या सूर्याला लाजरी संध्या बिलगते तेव्हां—

मी तशीच बिलगेन. हृदयाला. घट्ट मिठी मारून. तशीच मिठी. त्या दिवशीं मारली होती तशी. दिवाळीच्या अधल्या दिवशीं तो आला होता. अचानक. न कळवतां. पोष्टमन आला असेल म्हणून मी दार उघडलं. अन् दारांत त्याला उभा पाहून थक्क झाले. तो तसाच बाहेर उभा होता. माझ्यावर नजर रोखून. टवटवीत

हंसऱ्या चेहऱ्यानं. मी आंत उभी होते. त्या नजरेचे तुषार अंगावर झेलीत. लाजेनं चूर होऊन. आनंदानं बेहोष होऊन. स्तंभित.

"न कळवतां आलो म्हणून आंत घेणार नाहीस?"

अय्या! खरंच? खूप वेळ गेला होता?

"इश्य" मी आणिकच लाजले.

फार वेळ उभं राहावं लागलं का माझ्या राजाला? तिष्ठत. त्याच्या हातां-तली सूटकेस घेऊन मी आंत आले. दर-वाजा बंद करून त्यानं झेंप घेतली.

ती मिठी——

तो स्पर्श! दणकट बाहूंचा. मादक श्वासाचा. रसरसल्या ओठांचा. धुंद करणारा. दोन पुतळ्यांसारखे उभे होतो दोघेहि निश्चल. एकमेकांच्या गाढ मिठींत.

किती तरी वेळ.

"हेंच पाहायचं होतं मला. नैसर्गिक सौंदर्य. अशा अवस्थेंत. साध्यासुध्या. देवीची मूर्ति. साजशृंगार चढविण्यापूर्वी अशीच छान दिसतेस.

या साठींच न कळवतां आलो."

"इश्य!"

"हेच पाहायचं होतं दृश्य."

मी हंसले——

तो खदखदून हंसला. डोळे मिचकावीत. मिश्कील. लब्बाड.

"हें काय?"

तो बघत होता माझ्या स्फुरणाऱ्या वक्षस्थलाकडं.

मी पाहिलं. किंचित् बाहेर डोकावत होता झंपरच्या आडून. दडवलेला फोटो.

तोही मेला तसाच चहाटळ. असाच अवचित प्रगट होणारा. पुढं होऊन हस्त-गत केला तो त्यानं थोडीशी झोंबाझोंबी करून.

मी लाजले.

खूप खूप लाजले.

चोरटेपणानं तशीच उभी राहिले.

त्यानं एकदम हल्लाच केला. रानगटा-सारखं खस्कन ओढून. स्वतःच्या कवेंत. दोन्ही ओठ सांपडले होते. चुरगळल्या-सारखे. त्याच्या ओठांच्या पकडींत. श्वास गुदमरला होता माझा. धडपड करून सोडवून घेतलं. कसं बसं. त्या अडदांडाच्या तडाख्यांतून.

"काय हे?" डोळ्यांची फडफड करीत मी विचारलं.

"आणि हे काय?" हातांतल्या त्या फोटोकडं बोट दाखवीत त्यानं विचारलं.

"माझा आहे तो. आण इकडं."

"फोटो कशाला हवा आहे. मी स्वतःच आलो आहे ना आतां? मलाच दडवना तिथं."

वात्रट कुठला.

"तोच जास्त आवडतो मला. अहोरात्र जवळ असतो. हृदयाला बिलगून. मला एकटीला टाकून जात नाही. लष्करी पोशाख घालून. खाड खाड बूट वाजवीत. अशा तोऱ्यांत. काश्मीरच्या खोऱ्यांत."

"तिथंही तूं असतेस. सफरचंद! छे. तुझेंच गोवरे गाल! अन् तो गुलाब. पाकळ्यांचे नाजूक ओठ! याच ओठांची स्मृती."

कसं चकवलं होतं पण?

आला होता मारे लाडे लाडे बोलत. पुन्हां झडप घालायला. श्वास गुदमरून टाकायला.

"झाली की नाही फजिती! एका माणसाची. म्हणे आम्ही जवान. नेमबाजी करणारे. अचूक टिपणारे."

"जाशील कुठं? सुटशील कशी? टप्प्यांत आल्यावर निसटशील कशी?"

अन् खरंच कीं सांपडले. पुन्हा त्याच्या तावडींत. पाकोळी सारखी. त्याच्या नज-रेंत. हरलेल्या नजरेनं पाहात. स्वतःला झोंकून देत. पोलादी छातीवर. सुखावून. मोहोरून.

किती तरी वेळ.

हस्ताच्या पावसासारखी झोड.

एक सारखा मारा. ओठांचा.

या गालावर. त्या गालावर. ओठांवर.

इथं. तिथं. कुठंही.

"भूक नाहीं का लागली?" मी विचारलं.

"लागली होती. खूप. कडकडून."

"मग?"

"आतां पोट भरलं. गोड गोड न्याहरीनं."

"गोड फार खाऊ नये. पोट बिघडतं."

"कावीळ झालेल्या माणसाला चालतं."

"कावीळ?"

"होय. प्रेमाची. तुझी. जिथं तिथं तूं दिसतेस."

"आतां परत जाऊं नकोस. जाऊन उपयोग होणार नाही."

"कां?"

"नुसता बघत राहाशील. गोळी चाल-वणार नाहीस."

"वेडा समजलीस मला?"

"पेशंट. काविळीचा. जिथं तिथं मी दिसते. मग गोळी कुणावर चालवणार?"

"बन्दुकीचा चष्मा लावला म्हणजे दृष्टींत फरक पडतो. दूर दृष्टी येते. शत्रु शत्रू सारखाच दिसतो."

"बन्दूक आणली नाहीस?"

"कशाला?"

"थोडा वेळ हातांत दिली असती."

"इथं शत्रू आहे?"

"नाही. पण दृष्टींत फरक पडायला हवा आहे."

"काय म्हणून?"

"थोडा वेळ सुटका करून घ्यायचीय मला."

"कशासाठी?"

"माझा राजा आला आहे काश्मीर-

हून. त्याच्यासाठीं त्याच्या आवडीचं जेवण बनवायचंय."

"जेवण?"

"जेवायचं नाहीं?"

"वेळ कशाला घालवतेस? जाऊं कुठं तरी बाहेर जेवायला."

"नको. कंटाळा आला असेल तुला बाहेरचं खाऊन. कांहीं तरी तुझ्या आवडीचं करणार आहे."

"अच्छा. हरकत नाहीं. तोंवर मी स्नान उरकतो. निवांत. मनसोक्त. बऱ्याच दिवसांत मनासारखी आंघोळ मिळाली नाहीं."

"उद्यां मिळेल. मीच घालणार आहे."

"तूं?"

"होय. कां? उद्यां नर्कचतुर्दशी ना? अभ्यंगस्नान."

"तूं मला घालणार आणि मग मी तुला घालीन."

"इश्श."

"नाहींतर असंच करूंया—"

"कसं?"

"आपण दोघंहि बरोबर. एकमेकांना."

"चल. वेडा कुठला."

ती पहाट—

नर्कचतुर्दशीच्या दिवशींची—

भिजलेली. न्हालेली.

अभ्यंगस्नान!

अंगांगस्नान—एकमेकांनी एकमेकांना घातलेलं.

सुगंधी. गरम गरम. नरम नरम. उल्हासित करणारं. उत्तेजित करणारं.

वाटलं पहाट संपूच नये.

सूर्योदय होऊंच नये.

सूर्य! माझा सूर्य. विरहाच्या कुट्ट ढगाआडून हळुच उगवलेला.

काश्मिरी सफरचंदासारखा. लाल लाल.

हृदयांतला अंधार दूर करणारा.

क्षणा क्षणाला ऊब वाढवणारा.

तेजस्वी.

तळपणारा. समरांगणावर. मोठ्या तोऱ्यांत. काश्मीरच्या खोऱ्यांत.

—चार दिवसांची दिवाळी.

लखलखलेली. तेजानं उजळलेली. सुगंधानं भारलेली. ओथंबलेली. नाचत बागडत आलेली. खुशींत रमलेली. कुशींत शिरलेली. खुललेली. फुललेली.

सुगंध—दरवळणारा!

उन्माद—ओथंबलेला. न्हालेला. चिंब झालेला. पाझरलेला!

उन्मेष.

चार दिवसांतले. चार रात्रींतले.

एक एक स्मृती.

एक एक फूल.

एक पुष्पमाला. रंगीबेरंगी फुलांची. गुलाब—मोगरा. जाई नि जुई. प्राजक्त अन् चांफा. सायली आणि मालती. मरवा—

फुलंच फुलं.

एकाजवळ एक. दाटीवाटीनं जमलेली. ओवली गेलेली.

गळेपड पुष्पमाला——

चकाकणारी. लुकलुकणारी. समाधानाच्या कलावुतानं सजलेली.








हीच आज घालायची गळ्यांत.

संध्याकाळीं. सूर्य मावळेल तेव्हां. डोंगराआड जाणाऱ्या सूर्याला लाजरी संध्या बिलगेल तेव्हां.

मी तशीच बिलगेन. हृदयाला. घट्ट मिठी मारून. तशीच मिठी.

तशीच——

त्या संध्याकाळीं मारली होती तशीच.

दोन वर्षांपूर्वी. तो निघाला होता तेव्हां. मला सोडून. एकटीला टाकून.

पाणी खळत नव्हतं. डोळ्यांचं.

"वेडी कुठली. अशी रडतेस?"

"भीति वाटते रे."

"कसली भीती? मरणाची?"

"नकोस रे बोलूं असं अभद्र—"

"अभद्र? तें क्षुद्र. क्षूद्राची भीति कसली? वीर कधी मरत नसतो. रणांगणावर मेला तर तो अमर होतो. मला अमर व्हायचंय. असं मरायचं नाहीं. कसल्या तरी रोगानं. कशाच्या तरी धक्क्यानं. गजऱ्यांतली फुलं सुकतात. वेणींतली कुस्करली जातात. शेजेवरची चुरगळतात. वेलीवरची नाश पावतात. पण मूर्तीला वाहिलेल्यांचं निर्माल्य होतं. निर्माल्य! ज्यांत मलीनता नसते तें निर्माल्य. तुला मलीनता आवडत नाहीं ना? वीर मलीन होत नाही. तो सुकत नाही. म्हातारा होत नाहीं. सदा-सर्वकाळ तो जवान असतो. म्हणूनच लष्करी शिपायाला जवान म्हणतात. तूं जवानाची पत्नी आहेस. वीराची पत्नी आहेस. वीर पत्नी. वीर पत्नी अशी रडते? पूस. ते अश्रू. पूस. आधी पूस. हास. हास पाहूं. अस्सं. आणखी. आणखी थोडी. खळी नाहीं पडली अजून पूर्णपणें. गालाला. छान. सुंदर. आतां असंच हंसायचं. हास्याची फुलं टवटवीत ठेवायची. सतत. अखंड. सुकवायची नाहीत ती. मी पुन्हा येईन तेव्हांहि अशीच दिसली पाहिजेत. खुललेली. डंवरलेली. उमललेली."

"लौकर येशील ना परत?"

"संधी मिळाली की येईन. तूं प्रार्थना कर. देवीची. रणचंडिकेची. ती यश देईल. तुझं ऐकेल. तिला स्त्रीचं मन समजतं."

"जपशील ना तूं प्रकृतीला? तब्येतीला."

"तूं कां काळजी करतेस? सारं राष्ट्र काळजी वाहातं. साऱ्याच जवानांची."

"वचन दे मला."

"कसलं?"

"तब्येतीला जपशील म्हणून."

"जपेन. तुझ्यासाठीं. राष्ट्रासाठीं."

"डोळे लावून बसेन. तुझ्या वाटेकडं."

"संधी मिळतांच धांवत येईन. माझ्या लाडकीकडं. निघूं आतां?"

"हूं."

"नुसतं हूं नाहीं. नीघ म्हण."

"ये."

"ये?"

"असंच म्हणायचं असतं. शुभ वोला-यचं असतं. शुभ बोललं म्हणजे शुभच होतं."

"अच्छा. येतो तर."

"लौकर ये हं." आणि—आणि—ती मिठी—त्या संध्याकाळची.

—पुन्हां संध्याकाळ आली आहे. तीच. तशीच. तोच पोशाख. तसाच. पण आतां वाढ झाली आहे. छातीवर एका चिन्हाची. चक्राची. वीर चक्राची. वीर! माझा राजा वीर. मी वीर पत्नी. समरांगणांत शौर्य गाजवलेल्या वीराची पत्नी. आणखी एक वाढ झाली आहे. खांद्यावर. आणखी एका फुलाची. फूल! सोनेरी फूल. मी राणी. फुलराणी. हातांत माझ्या पुष्पमाला. घाल-णार आहे गळ्यांत. वीराच्या. जाणाऱ्या—आणि लौकर परत येणाऱ्या वीराच्या आतां खात्री वाटते आहे. तो लौकर परत येणार आहे. कारण आता शांत झाली आहे. रक्तासाठीं आंसुसलेली धरित्री. आतां मावळला आहे. युद्धांत प्रखरतेनं तळपणारा सूर्य. आतां संपला आहे रणरणता दिवस. अन् लौकरच येणार आहे पुनवेची रात!" ●●●












*ते आले, एका*
*वेगळ्याच जगात तिला*
*(तिच्या नकळत)*
*घेऊन गेले – ते गेले.*
*एक नाजुक*
*फुंकर घालून....*




# फुंकर

—पद्माकर गोवईकर

**रात्रीचे** आठ वाजले होते. मागच्या व्हरांड्यात बसून सुधा चहा घेत होती. जेवायला अजून अवकाश होता. पण मन मरगळले होते. पोटातल्या भुकेपेक्षा मनावरची कोळिष्टके झडून पडावीत, तरतरी यावी म्हणून ती चहा घेत होती. भूक मेली तरी चालेल पण मन तरतरीत रहावे, याची ती नेहमीच काळजी घेत होती. चांदण्याच्या फुलांनी उमललेले आभाळ समोर पसरले होते. त्याकडे पाहात तिने चहाचा कढत घोट घशाखाली घातला. आभाळाकडे पाहता पाहता तिचे मन तिच्यातून उठून बाहेर पडले आणि लांब लांब, भटकून आले... वस्तीपासून दूर असलेल्या त्या क्वार्टरमध्ये आता नेहमीपेक्षा जास्त शांतता वाटत होती. सन्नाटा वाटत होता. त्या सन्नाटचावर रातकिडयांची किरकिर चालू होती, आवाज न करतां अंधार वाहत होता. सगळ्या परिसरावर कुणाचा तरी अशरीरी पहारा असल्यासारखे वाटत होते. पुढचे दार तिने बंद केले होते. अंगणातून येणारा वारा दोन खोल्यातून भणभण आवाज करीत वाहात होता. मागच्या बाजूला असलेल्या रानातल्या झोपड्यातून जनावरांच्या हंबऱ्यांचे आवाज येत होते... नदीकाठचा पिंपळ आता हलु बोलु लागला होता. त्यावर उलटे टांगून घेतलेल्या वटवाघळांची फडफड चालू झाली होती. लांब कुठे तरी नदीच्या पात्रावरून टिटॅव टिटॅव करीत टिटवी ओरडत होती. हे सगळे नेहमीचेच होते.

आभाळावर पापण्या टेकवून ती चहा घेत होती. तेवढ्यात बाहेरचे दार खडखडले. ती थबकली. चहा घेता घेता थांबली. आपलेच दार वाजले आहे याची खात्री करून घेण्यासाठी ती गप्प बसली. तिने काही विचारले नाही. दार पुन्हा वाजले आणि तिची खात्री झाली. ती उठली. दोन्ही खोल्या ओलांडून अंगणात आली शंकित मनाने तिने दार उघडले...

अंधारामुळे तिला समोरची व्यक्ति चटकन् दिसली नाही. 'कोण आहे' विचारायच्या आत हातात ब्रीफ केस घेतलेली व्यक्ति नमस्कार करीत पुढे आली. . . .

"नमस्कार. . . ओळखल नाहीस वाटतं ! मी अनंतराव..."

"अगबाई, अंधारात मी ओळखलंच नाही..."

अनंतराव—तिच्या धाकटया वहिणीचे, मालूचे यजमान..ते हसत आले. त्याना असे अकस्मात आलेले पाहून सुधा— गोंधळली. माणूस कळवून आले म्हणजे तयारीत राहाता येते. काही करून ठेवता येते. घरदार स्वच्छ ठेवता येते. अनंतराव काही न कळवता, सवरता आले होते. काही वाईट.... पण त्यांचा चेहेरा तर हंसरा आहे. आपण काय विचारत आहोत ते तिला कळलेसुद्धा नाही.

"कुठून आलात–?"

अनंतरावांचा स्वभाव गमत्या होता. ते म्हणाले,





अनुक्रमणिका

"कुठून म्हणजे ? मी जिथे राहतो तिथून——"

"पण सामान काहीच नाही——"

"नाही आणले. ऑफिसमधून निघालो तो गाडीतच बसलो. बदलण्यापुरतेसुद्धा कपडे घेतले नाहीत.. आता लावून घ्यायला तुझी साडी दे. . . "

"मालू बरी आहे ना?" सुधाने विचारले.

"तिला काय होतय् ! अजून वीस-पंचवीस वर्षं तिला काही होणार नाही अशी तब्येत आहे. . . "

दोघेहि हंसले... पण सुधाचे मन आतल्या आत चावतच होते. सगळे ठीक आहे तर स्वारी एकाएकी का आली ? सहज आले असतील. . . विचारायचे कसे ? तिच्या या जागेत ते प्रथमच येत होते.

दोघे आत आले. खुर्चीत बसता बसता अनंतराव म्हणाले,

"सकाळी ऑफिसला निघताना मी मालूला म्हणालो, आज संध्याकाळच्या गाडीने सुधाकडे जाणार. बॅग भरून ठेव. तेव्हा ती म्हणाली, पुरे झालं तुमचं. चार वेळा बॅग भरली आणि मोकळी केली.... घरी आलांत की कंटाळा करता. ऑफिसमधून परस्परच जा. तिच्याकडे सगळी व्यवस्था होईल. म्हणून तसाच निघून आलो..."

"बरं केलंत—" त्यांच्या हातात चहा देत ती म्हणाली, "नाही तर कशाला येणं होतय्. . . !"

"हे काय, जादू बिदू शिकलीस काय ?" तिने इतक्या लवकर चहा आणलेला पाहून ते चमकलेच.




"हो, आता तेवढंच राहिलंय्..." ती हंसत म्हणाली

"एवढ्या लवकर कसा आणलास चहा . . ?"

"गॅसवर लवकर होतो. . . "

"वा ! सगळी सोय दिसते क्वार्टरमध्ये. . . "

"हो. . लाईट, नळ सगळं आहे. . "

"नळ ? कुठ वसवलेत ?"

"इथं जवळच ट्यूब वेल आहे. तिथून सगळ्या क्वार्टरला पाणी पुरवलं जातं. . . "

"पाण्याची आणि लाईटची सोय असेल तर मला जंगलातसुद्धा राहायला आवडेल..."

"आवडल आणि नाही आवडल तरी राहायला हव. कसे तरी दिवस ओढायचे. . . "

"पण इथ तुला कंटाळा नाही येत ?"

"नाही येत. . . "

"फार शांत आहे...भीति वाटत नाही तुला या शांततेची ?"

"आता नाही वाटत. सुरुवातीला वाटायची. आता ही शांतताच आवडते. कुठे गर्दीत गेले की मन घाबरते. . . "

"का – ?"

"उगाच. वाटतं, बुडबुडे सुटलेल्या मोकाट पाण्यात मी बुडते आहे."

"अस वाटतं !"

"हो. . . "

"चमत्कारिकच आहे." चहाचा घोट घेत अनंतराव म्हणाले,

"पण तुझी ही नोकरी फिरतीची आहे ना ?"

"फार नाही फिरावं लागत. आसपास जाव लागतं. ग्रामसेविकांवर देखरेख करावी लागते. बरोबर प्यून असतो...."

"म्हणून काय झालं ! मला तर वाटतं, तुझी ती पहिली मास्तरणीची नोकरीच बरी होती..."

"त्या दृष्टीनें बरी होती पण तिथला ए. ओ. फार वाईट माणस होता." (तेव्हा ती कौमार्याच्या आणि पावित्र्याच्या खोट्या पापुद्र्याखाली वावरत होती.)

"होय.. काय बरं त्याचं नाव .. . "

"फाळे..."

"फाळे. फाळे.. वा ! तो म्हणजे शिक्षणक्षेत्रातला वॉलकॉटच आहे. बाकी अलिकडे काय, सगळ्याच क्षेत्रात बृहस्पति आहेत...."

दोघेहि हंसले.

"कपडे बदलता ना ?" तिने विचारले.

"बदलायचे म्हणजे काय, अंगावरचे काढायचे फक्त... आणलेत कुठं दुसरे... तुझी एखादी साडी दे जुनी...लुंगीसारखी लावून घेतो."

"जुनी का ? ही घ्या ना चांगली धुतली. . . "

तारेवर वाळत घातलेली साडी तिने काढली आणि अनंतरावांना दिली. पलिकडच्या खोलीत कपडे बदलायला

अनंतराव गेले... कपडे बदलून नळावर हात-पाय-तोंड धुवून ते आत आले तो सुधाने जेवायची तयारी केली होती.. एकट्याचे पान वाढलेले पाहून ते म्हणाले,

हे काय, तू बसणार नाहीस ...?'

"तुमच झाल्यावर बसत्ये.."

"कमी आहे का स्वयंपाकाचं काही ? झाल्यावर बसू दोघ..."

"नाही...नाही... कमी कुठलं ! आज उलट जास्तच स्वयंपाक झालाय."

"जास्त स्वैपाक ? कोण येणार होतं का ?"

भातावर तूप वाढत ती म्हणाली,

"येणार कोण ! कालच तात्या येऊन गेले... पण सकाळपासून वाटत होत, कुणीतरी येईल म्हणून. . . . "

' "आश्चर्य आहे. . . !"

"आहे खरं... पण खरच वाटत होतं... "

गप्पा करीत अनंतरावांचे जेवण झाले. नंतर ताट घेऊन सुधा बसली. तिचे जेवण होईपर्यंत अनंतराव समोरच्या पाटावर गप्पा करीत बसले. अनंतरावांना बायकांचा स्वभाव चांगला माहित होता. जेवण होईपर्यंत त्यांच्याशी गप्पा मारीत बसले की बायका आनंदी असतात...मोकळेपणाने बोलूं लागतात, हे ते त्यांच्या स्वयंपाकघरातून कधीच बाहेर न येणाऱ्या एका मामाकडून शिकले होते... गोष्टी करीत बराच वेळ गेला हे सुधाच्या लक्षात आले,

"अगबाई, गप्पात काही कळलंच नाही...किती वेळ पुरुषासारखी जेवत बसल्ये..."

"सावकाश जेव. आता काय ऑफिसची गडबड आहे का ?"

सुधा गडबडीने उठली. उष्ट खरकट, दुधाची झाकपाक सगळे आवरून तिने कॉटवर अनंतरावांचे अंथरूण घातले. अनंतराव आहेत तोपर्यंत संसार मांडल्यासारखे सुख घ्यायचे. त्यांचे सारे नवऱ्यासारखे करायचे असे तिने ठरवले होते. ते पाहून अनंतराव म्हणाले,

"कॉटची तुला सवय असेल. तू वर झोप. मला खाली सतरंजी घालून दे."

"नाही. नाही.. मला कशावरहि झोप येते.. तुम्हीच कॉटवर झोपा.."

"नको, अग.."

"तुम्ही सतरंजीवर झोपणार असाल, तर मी फरशीवर झोपेन.."

बाऽऽऽऽ रं राह्यलं..."

साडीची लुंगी नेसलेले अनंतराव कॉटवर बसले. अंगावर शाल घेऊन, भिंतीशी टेकून खाली सुधा बसली. पुन्हा गप्पा सुरू झाल्या..

"तात्या काल होते ?" अनंतरावांनी विचारले,

"हो."

"का ? काही ? विशेष ?"

"अंजूच्या डोळ्यांना एकाएकी कमी दिसू लागले. इथं काही चांगल्या डॉक्टरची सोय नाही...म्हणून तिला न्यायला आले होते..."

"अंजूला आता एकोणीसावे लागले नाही का ?"

"हो..."

"तिने शाळा का ग सोडली अर्धवट ?"

अपुऱ्या वाढीच्या, खुजा अंजूनं शाळा का सोडली ? तात्यांचे दारिद्र्य ? आता काय सांगायचे ? आपल्यावर फार मोठा अन्याय झाल्यासारखा तिने चेहरा केला... अपराधी स्वरात ती म्हणाली,

"तिचे शाळेकडे लक्षच नव्हतं म्हणून काढली तिला आणि माझ्या हाताखाली आणली होती..." आणि तिचा विषय पुढे वाढू नये म्हणून ती पुढे चटकन् म्हणाली, "मुक्ता आणि बेबी आता मॅट्रिकला आल्यात..."

"मग त्यांचा खर्च आता तुलाच बघावा लागत असेल..."

"हो. तात्यांच्या नावावर दरमहा ऐंशी रुपये पाठवते मी... त्याना आता पेन्शनीवर भागवावं लागतं..."

"विमा वगैरे उतरलास कां ?"

"हो—नुकताच... पांच हजाराचा..."

"छान..."

काही वेळ कुणीच काही बोललं नाही... लांबवर ओरडणारी अशुभ टिटवी ऐकू येत होती.

अनंतराव पुन्हा तिला म्हणाले,

"सुधा, खरंच तू कॉटवर झोप..मी खाली....."

"हें चांगलं आहे. पाहुण्यांनी जमिनीवर झोपायचं आणि मी वर होय ! झोपा आता—"

तिने उठून दिवा घालवला. खोलीत अधार झाला.

"मला अजून पाहुणा समजतेस....?"

"लहान बहिणीचा नवरा पाहुणाच असतो..." सुधा हंसून म्हणाली.

मग दोघेहि झोपले. नदी काठावरून वटवाघळांचा, टिटवीचा गोंधळ ऐकू येत होता... मधेच कुठेतरी कौलारांतून कुरकुर आवाज

**कर्मकथा—**




अनुक्रमणिका






करीत उंदीर पळत होते. पावले न वाजवता अंधार चालत होता. सुधा कुशी बदलत होती. तिला झोप येत नव्हती. रात्रीचे आवाज ऐकत ती स्वस्थ पडून होती. डोळे टक्क उघडे ठेवून ती अंधाराकडे पाहात होती. समोर कॉटवर अनंतराव झोपले होते. अंधारात त्यांची अस्पष्ट आकृति दिसत होती. त्यांच्याकडे पाहता पाहता तिला वाटले, हेच अनंतराव आपला नवरा असते तर आज आपण असे अडगळीत पडल्यासारखे झोपलो नसतो. वेडयावाकडया कशाहि पद्धतीने आपण त्यांचा संसार केला असता. त्यांचाच काय, कुणाचाहि केला असता. कुणीहि तिला संसारात आपली म्हणून ओढून घेतली असती तर संसाराचे सारे कष्ट काढायला, मुलांच्या, नवऱ्याच्या खस्ता काढायला तिला हुरूप आला असता. ती त्यांची कायमची ऋणी झाली असती. पण तिच्या नजरेने जे मागितले ते तिला कधीच कुणी दिले नाही... पाठीवर चार वहिणी आणि एका बापाच्या दुःखाचे आवाळू वाढले होते. त्यांच्यासाठी काळजी करण्यात सगळ्या पोरसवदा इच्छा जळून गेल्या. तारुण्याचा उन्माद, प्रौढेचे पूर्णत्व ह्या अवस्था तिच्या आयुष्यांत कधी येणारच नव्हत्या. तिच्या जीवनाची कळी कोणत्याहि मानुष वाटसरूच्या हातून खुडली जाणार नव्हती. मध्यमवर्गाच्या, मुलगा नसलेल्या कुटुंबाचे दायित्व तिच्याकडे होते. निसर्गाच्या जर्जर नियमाप्रमाणे ती तशीच अस्पर्श राहून वाळून जाणार होती... संसार करण्याची तिची इच्छा शेपटी हलवत तशीच तिच्या मनांत उभी राहणार होती.

तिला वाटले अंधारातून उठावे आणि रस्ता फुटेल तिकडे चालत जावे... आणि चालता चालता रस्त्याकडेला मरून पडावे...

अंधारात या कुशीवरून त्या कुशीवर होताना अनंतराव तिला पाहात होते. तिची घुसमट ऐकत ते स्वस्थ पडून राहिले होते.

सुधाने डोळे उघडून पाहिले तेव्हा सकाळ झाली होती. खोलीत उन्हे लोळत होती. स्वच्छ प्रकाश पडला होता. ती गडबडीने उठली.

चहा तयार झाल्यावर तिने अनंतरावांना उठवले. दाराशी पडलेले वर्तमानपत्र आणि चहा तिने टेबलावर ठेवला. कॉटवर बसत तिनेच त्यांना विचारले,

"रात्री झोप आली नाही वाटतं तुम्हाला ?"

"नवीन जागा होती. थोडया उशिरा आली... तुला...?"

"मी लगेच झोपले—" अनंतरावानी ओळखले, ती खोटे बोलली होती...

चहा पिऊन झाल्यावर अनंतराव वर्तमानपत्र चाळू लागले.

"लवकर येतो पेपर—"

"मुख्य सडकेवर आहे ना, ही जागा..."

"हां ! एका बाजूने रेल्वे, एका बाजूने एस्. टी..."

चहा झाल्यावर सुधा लगबगीने उठली.

"मला थोडं ऑफिसच्या कामाला जायचय्—तुम्ही बसा."

"इतक्या लवकर ?"

"आज एक मिटींग आहे. बी. डी. ओ. येणार आहेत. तुम्ही आंघोळ वगैरे करून घ्या. मी येतेच एका तासात..."

"सरकारी काम म्हणजे गेलेच पाहिजे. जा तूं...मी आवरतो माझं."

"तुम्हाला एकटं वाटायचं नाही ना !"

"तू इथं वर्षान् वर्ष एकटी राहतेस... एक तासभर मी राहू शकणार नाहीं का ?

चहाच्या कपबशा घेऊन ती आत गेली. पंचवीस मिनिटांत आंघोळ करून, कपडे बदलून, हातात फाईल घेऊन ती अनंतरावांपुढे येऊन उभी राहीली. तिने फिक्या गुलाबी रंगाची साडी नेसली होती. त्यावर मॅचिंग ब्लाऊझ घातला होता. वेणीत मागच्या दारची पिवळ्या गुलाबाची एक टपोरी कळी खोवली होती. पायात तांबडया पट्ट्याची चप्पल घातली होती. अनंतराव स्तंभित होऊन तिच्याकडे पहात होते.

"काय पाहाताय ?" तिने विचारले..

अनंतराव हसले आणि म्हणाले,

"हे देखणेपण कुणाला मिळणार याचा विचार करतोय् !"

"का ? माझ्यापेक्षा देखणी माझी धाकटी बहीण तुम्हाला मिळाली आहे ना ! माझी कशाला काळजी करता !" सुधा हसून म्हणाली.

"मिळाली म्हणजे काय, ती दाखवली म्हणून तिच्याशी लग्न केलं...

त्यावेळी चुकामुक व्हायला हवी होती असं वाटतं.."

"सांगू का हे मालूला...?" ती असे म्हणाली. पण खरे तर तिला असे वाटले होते की, अजून वेळ गेली नाही. आत्ता, या क्षणाला कशाची हरकत आहे ? कशाचा व्यभिचार आणि पावित्र्य ?

दोघेहि हसले.

"बरं जात्ये... काही लागलं तर घ्या... मी येतेच..."

आणि ती निघून गेली.

दोन-अडीच तासानी ती परत आली. सकाळची उन्हे भिंती चढून अंगणांत आली होती. खुर्चीत तिच्यासमोर बसत अनंतराव म्हणाले,

"ही साडी तुला खुलून दिसते. लग्न ठरलेल्या मुलीसारखी दिसत्येस.."

त्यांच्या या बोलण्याने तिला एकीकडून वेदना झाल्या. दुसरीकडून बरे वाटले. अळवाच्या पानाएवढा जीव झाला. ती एकदम हसली आणि म्हणाली,

"खरंच ? असं बोलणारंसुद्धा इथं कुणी नाही... चला, तुम्हाला भूक लागली असेल.. मिटिंगमध्ये फार वेळ गेला..आत्तां करते जेवण.."

"सावकाश होऊ दे... काही गडबड नको.. कपडे बदल आधी..."

"पण या साडीत मी चांगली दिसत्ये ना... !"

"म्हणून काय साडी खराब करणार ?"

ती उठली आणि आत गेली. तासाभरात तिने स्वयंपाक तयार केला. दोघेहि गप्पा करीत जेवले...

जेवण झाल्यावर सुपारी चघळत अनंतरावांनी तिला विचारले,

"सुधा—" त्यांचा स्वर बदलला होता.

अनुक्रमणिका






"काय ?"
"एक विचारू-?"
"विचारा ना–"
"राग नाही ना येणार ?"
"विचारा तर !"

"तात्यांना मी पत्र पाठवलं होतं. त्यांचं उत्तर परवा आलं. त्यात त्यांनी लिहिलय की, तुला लग्न करायचं नाही असं तू म्हणत्येस ?–"

कुणी तरी नखे रुतल्यासारखा तिचा चेहरा झाला. माणसे किती खोटी असतात. सगळा माकडीणीसारखा खेळ. पाणी पायाशी आहे तोवर पोर डोक्यावर घेतील. गळचाशी आले की तेच पोर पायाखाली घेऊन त्यावर उभे राहतील... तात्यांना ती तिच्या लग्नाचे बोलली तेव्हा डोळे बाहेर काढून ते तिला म्हणाले होते,

"पाठीवरच्या वहिणी आणि मला कुठे तरी ढकलून दे आणि मग लग्न कर— समजलीस ?"

तेव्हा पासून तिने तो विचार लाथ मारून हाकलून दिलेल्या कुत्र्यासारखा मनातून हाकलून दिला होता......

"खरं आहे हे ?" अनंतराव विचारीत होते...

"ह....हो... इतक्यात माझा विचार नाही." ती खाली मान घालून म्हणाली...

"मग केव्हा, म्हातारी झाल्यावर !"

तिने क्षणभर अनंतरावांकडे पाहिले आणि मग डोळचांतली व्यथा ती तोंडाने बोलू लागली.

"सगळे जण मला हेच विचारतात, पण कुणीच विचार करीत नाही. तात्यांना पेन्शन मिळाले. पाठीवर लग्नाच्या तीन चार वहिणी... मुलासारखी मिळवती मी फक्त. एकटीच्या सुखासाठी मी घराबाहेर पाऊल टाकलं तर मागे सगळ्या घराचा उन्हाळा होईल.. तुम्ही पाहताच, मालूसुद्धा माझ्याहून लहान आहे.. तिचं लग्न आधी केलं... माणस नुसती चौकशी करतात..."

मग ती बराच वेळ बोलत राहिली. एखाद्या प्राचीन पुतळचाला वाचा फुटावी तसे ती भडाभडा बोलली. अनंतराव शरमून गेले. कोपऱ्यातल्या केरासारखे कुणी तरी आपल्याला कागदावर गोळा करावे आणि पुडी करून बाहेर फेकून द्यावे, असे त्यांना वाटले.

अंगणात आता चमत्कारिक शांतता पसरली होती. खुर्चीच्या लाकडी हातावर आपले हात ठेवून सुधा डोळे विस्फारून अनंतरावांकडे पाहात होती.

"...आता माझ्या लग्नाचा प्रश्न नाही आहे. काळजी आहे— मुक्ताच्या आणि अंजूच्या लग्नाची— पण एकटी पडल्ये मी ! खूप वेळा वाटलं, तुम्हाला बोलवावं. पुरुष माणसाच्या आधाराने सगळे ठरवावे... पण तुम्ही पत्राची उत्तरे सुद्धा पाठवत नाही...."

अनंतराव आणखी लहान झाले. यापेक्षा कुणाच्या तरी लाथाबुक्क्या खाव्यात असें त्यांना वाटले. ते गप्प असलेले पाहून ती त्यांना म्हणाली,

"बोलत का नाही तुम्ही– ?"

"माफ कर, सुधा ! मुक्ता—अंजूचा प्रश्न आहेच, पण तूं जन्मभर अशीच राहणार कां– ?"

"हो... आता वयाची अठ्ठावीस वर्षं तर गेलीच... राहिलेला वेळ काढायला नोकरी आहे. आणि त्याची आता जरुरीहि वाटत नाही... वाईट वाटतं थोडं, पण अनेक गोष्टींसाठी एखादी गोष्ट सोडावीच लागते... नेम धरून आयुष्य पकडता येत नाही..."

बोलता बोलता ती थांबली. आलेला आवेग तिने ओसरु दिला.













पुन्हा शांत आवाजात म्हणाली,

"तुमच्या खूप ओळखी आहेत. ऑफिसमध्ये, बाहेर अंजूकरता एखादं स्थळ पहा... देण्याघेण्यासाठी मी जीव गहाण ठेवीन. तुम्ही मला एवढी मदत करा... कराल का ?"

सुधा त्यांच्याकडे पाहू लागली. अनंतराव गप्प होते.. बाहेर दुपार पसरली होती. उन्हाच्या कडक भिंती ताठ उभ्या होत्या. समोरच्या लिंबाच्या झाडावर एक कावळा टिर् टिर् आवाज करीत रख्ख दुपारला भोक पाडीत होता. अनंतराव त्याकडे पहात होते. सुधा पुन्हा म्हणाली, "माझं बोलणं आवडलं नाही कां तुम्हाला ?"

"तू म्हणतेस ते खरं आहे, सुधा... अर्ध्या रात्रीसुद्धा मी तुला मदत करायला येईन... त्यासाठी याचना कशाला करतेस. . . ?"

त्यांच्या बोलण्याने तिला हलके वाटले. आपल्यावरला निम्मा भार कमी झाल्यासारखे वाटले. ती हसली... एकदम आठवण झाल्यासारखे म्हणाली,

"अगबाई, बोलण्यात गेली, वेळ कळली नाही... चार वाजले की.... चहाला ठेवत्ये ..."

गडबडीने उठून ती आंत गेली.

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात अनंतरावांना वाटले, अन्नावर हिचे शरीर पोसले जात असेल पण ही एकटी असेल तेव्हा हिच्या मनाचे काय होत-असेल ! कुठे भरकटत असेल ते ! कुठे गुंगत असेल ! त्यावरील उदात्ततेच्या खरपुड्या निघाल्यावर खाली काय असेल ! वासना ? शरीरसुखाच्या, संसाराच्या इच्छा हिला नाहीतच का ? हिला मनच नाही का ?

या विचाराने ते दचकले. त्यांच्या कपाळावर घाम जमला, घशाला कोरड पडल्यासारखे झाले...



चहाला ठेवून सुधा बाहेर आली. तिच्याकडे पाहातच ते एकाएकी म्हणाले,

"सुधा, संध्याकाळच्या गाडीने जावें म्हणतो—"

"एवढी काय घाई आहे ? सकाळच्या गाडीने जा. पहिल्यांदाच आलात. सकाळी सातच्या गाडीने गेलात तरी ऑफिस मिळेल. अडीच तासाचा तर रस्ता—"

"ते खरं, पण फार धांदल होईल... आणि आता आपली गाठ झाली... सविस्तर हकिकती कळाल्या. आता कशाला थांबू –?"

"तुम्ही जाणारच म्हटल्यावर मी काय बोलणार ? पण आजची रात्र थांबा.. कधी नव्हे ते तुम्ही आलात. जेवायलासुद्धा गोड धोड काही केलं नाही. रात्री थांबलात तर करता येईल...."

अनंतरावानी तिच्या डोळ्यात पाहिले. त्यांना तिचा आग्रह मोडवला नाही... ते 'ठीक आहे—' म्हणाले–

बाहेर आता आभाळ आले होते... उकाडा मनस्वी वाढला होता. वेडेवाकडे वारे सुटले होते. व्हरांड्यात जाऊन ते दोघे चहा घेऊ लागले तेवढ्यात पाऊस सुरू झाला. वळवाच्या असंख्य धारा कोसळू लागल्या. आडव्या उभ्या पावसाकडे पाहात दोघानी चहा घेतला......

संध्याकाळी दूधवाल्याकडून तिने खूपसे दूध घेतले आणि रात्रीं बासुंदीचा बेत केला. बाहेर पाऊस पडत होता. गारठा वाढला होता. ओल्या गारठ्यात गरम गरम जेवण करून ते गप्पा मारीत बसले.. बारावर एक वाजून गेला तरी ते दोघे बडबडत होते. बोलता बोलता ते दोघेहि— केव्हा तरी गप्प झाले, आणि झोपी गेले...

सकाळी सहा वाजता सुधाला जाग आली तेव्हा बाहेर धुके पडले होते...वातावरण धुंद झाले होते. ती घाईघाईने उठली. तिने चहा केला आणि अनंतरावांना उठवले. सात वाजता गाडी होती. अनंतरावांनी गडबडीने चहा घेतला आणि ते निघाले...

बुटाचा बंद बांधता बांधता म्हणाले,

"बरं निघतो—मालूला काय सांगायचं ?"

सुधा एकदम हसली. कालपासून डंसणारी शंका विचारण्यासाठी तिने धीर केला,

"एक विचारू ?"

"विचार ना !"

"तुम्ही निघालात खरे, पण का आला होतात? काही काम होते की सहजच ?"

अनंतराव दचकले. हा प्रश्न ती विचारेल असे त्यांना वाटले नव्हते.. ते सटपटले.. बिचकल्या स्वरात म्हणाले,

"सांगू ?"—"

"हं !"

"माझा धाकटा भाऊ परवा असिस्टंट कलेक्टर झाला. घरात त्याच्या लग्नाच्या गोष्टी चालू आहेत.. त्याच्यासाठी तुला मागणी– घालायला मी आलो होतो—"

तिने मान खाली घातली... ते आणखी काय बोलले हे– तिला ऐकू आले नाही. शेवटचा निरोप घेण्याचेहि तिला भान राहिले नाही... बाहेर जाणाऱ्या पाठमोऱ्या अनंतरावांकडे पाहता पाहता तिला एवढेच वाटले, अनंतराव आपला नवरा आहेत... ते ऑफिस-मध्ये निघाले आहेत आणि आपण त्यांना दारापर्यंत पोचवायला आलो आहोत—

●●●




प्रा. सुरेश गजेंद्रगडकर

**.... खर म्हणजे बुद्धिबळाचा एक डाव संपेपर्यंत तरुणांचे म्हातारे झाल्याच्या कथा आहेत**

**संध्याकाळीं** फिरत फिरत परळ नाक्यावरून येत होतो. कोपऱ्यावरच्या पानवाल्याकडे पान बनवून घेतले आणि अचानक पलीकडेच असलेली वेड्यावाकड्या अक्षरातील पाटी दिसली. "एथे बुदबळ खेळाला मिलल" कुतूहलाने मी तिकडे शिरलो. दोन खुर्च्या समोरासमोर मांडलेल्या होत्या आणि त्यावर बुद्धिबळाचा पट ठेवला होता. त्याच्या पलीकडे दोघे जण डाव मांडून खेळत होते. मी थोडा वेळ खेळ पाहिला. तिथे असलेल्या एका माणसाने विचारले "खेळणार काय ?"

"चला."

त्या क्लबाचा नियम त्याने मला ऐकवला. जो हरेल त्यानें पंधरा पैसे द्यायचे.

"ठीक आहे" माझ्यातला कॉलेज चॅम्पिअन् बोलला.

"पांढरी मोहरी हवी की काळी ?" पिवळा हत्ती पेटवत त्याने प्रश्न विचारला.

"कुठलीहि चालतील" मी हसू लपवले.

"ठीक तर. तुम्हीं पांढरी घ्या आणि करा सुरवात." मी खेळाची सुरवात अगदी सुरेख, पुस्तकात दिल्याप्रमाणे केली. चार पांच खेळी झाल्या. तो सगळ्या खेळी अत्यंत निष्काळजीपणे व भराभरा करत होता. खर म्हणजे बुद्धिबळाचा एक डाव संपेपर्यंत तरुणांचे म्हातारे झाल्याच्या कथा आहेत !

पांच मिनीटात मी त्याची दोन प्यादी व एक उंट खाल्ला. आणि आता मात व्हायला फारच थोडा अवकाश होता. परंतु काय झाले कळले नाही आणि त्याचा वजीर घोड्याच्या जोरात सर्कन् पुढे घुसला आणि राजाच्या शेजारी उभा राहिला.

"शह ! – मात झाली ! पुन्हा खेळणार ?" सिगरेट विझली मी त्यानंतर सहा डाव खेळलो. त्यांत कांहीं अर्थ नव्हता. खेळण्यांतल्या शिपायाने जनरल चौधरींशी दोन हात केल्यासारखे होते. मी पार खलास झालो होतो.

"हं ! आज माझा घातवार असावा !" असे म्हणत मी उठलो.

"तुमच्याकडे पाच डावांचे पैसे लागू झाले !"

"नाही ! मी सात वेळा हरलो."

"ठीक" असे म्हणत त्याने सिगरेटच्या पाकीटाच्या मागच्या बाजूस पेन्सिलच्या थोटकाच्या मदतीने हिशेब केला आणि "९० पैसे द्या." असे सहास्य मुद्रेने सांगितले.

"तुम्ही कमी का घेता ?" मी खिशातून पाचाची नोट काढत त्याला विचारले.

त्याने १५ व ७ हे आकडे पुन्हा मांडले व गुणाकार करून २.२५ गुणाकार लिहिला. पुन्हा चुकल्यावर त्याने १५ हा आंकडा सातदा लिहून बेरीज केली आणि १.०५ हिशेब सांगितला.

मी सारे थंडपणे बघत होतो. मला कुठेतरी आनन्द होत होता.

मी पुढे केलेली पांचाची नोट त्याने हातांत घेऊन चक्क शिवी दिली.

आणि पुन्हा कागदावर आकडेमोड सुरू केली. शेवटी दरवेळेस वेगळी उत्तरे आलेली पाहून त्याने मला किंचित् शरमून विचारले,

"मोड नाही का ?"

मी ती पाचाची नोट उचलून ज्या बुद्धिबळाच्या पटावर माझी जिरली होती त्या पटावर ठेवली मान वर केली आणि म्हटले "काही हरकत नाही– राहू दे तुमच्याचकडे !"

आणि समाधानाने बाहेर पडलो.

●●●













-दा. गो. देशपांडे



.... ज्या माणसाशी माझे लग्न झाले, त्याला एक असाध्य रोग असताना त्याने माझ्याशी लग्न केले. त्याला बायको प्रपंचाला व प्रतिष्ठेला एक शोभा म्हणून हवी होती. बायकोचे भांडवलही करण्यास तो पुढे मागे पहाणारा नव्हता....

वय १६. सत्यभामा → सौ.<br>
श्री. ← अश्वथराव य २३ } पतिपत्नी<br>
तीस वर्षांपूर्वीचे—

—मध्यमवर्गीय सुखी कुटुंब. नवराबायकोंत कधीं विसंवाद आला नाही. पतीला देव मानतात अशा घरांत आणि समाजांत सत्यभामा वाढली. नवरा म्हणेल ते खरं आणि दाखवेल ती दिशा. जे मिळालं त्यांत सुख. पातिव्रत्य आणि त्याग यांचं मोल प्राणापेक्षा जास्त.

अश्वथरावांना लाभलेले देणं कांहीं वडिलार्जित आणि कांहीं स्वार्जित. चांगलं आरोग्य, उत्तम चेहरा आणि सुदृढ देहयष्टी ही अनुवंशिक आणि शिक्षण आणि आर्थिक स्वावलंबन स्वत:चं. शिस्त आणि चारित्र्य यांचे फार महत्त्व.

अश्वथरावाच्या आईबापानी आपल्या ह्या एकुलत्या एक मुलाचा वाढता, फुलता आणि फळता संसार पाहिला. दहा वर्षांत पाच मुले—चार मुलगे आणि एक मुलगी-अंगाखांद्यावर खेळवली. त्यांच्या स्वत:च्या आयुष्यांतील— एक नाही दोन नाही— दहा मुलें निर्दय नियतीने नेल्याचे दु:ख असे निवले. एकच मुलगा वृद्धापकाळी टिकला आणि त्याची वंशवेल अशी विस्तारली. त्यांची मनें तोषली आणि अशा संतुष्ट अवस्थेतच ती दोघें, देवाघरचे बोलावणे आल्यावर एक वर्षाच्या अंतराने गेली.

प्रथम सत्यभामाची सासू गेली तेव्हां लोक म्हणाले 'भाग्यवान, अहेवपणी मरण आलं' त्यावेळेस सत्यभामाची पाचवी खेप होती. सुतकाच्या काळातच बाळंतली. मुलगी झाली आणि जुनी मंडळी म्हणाली "आजीचा पुनर्जन्म झाला—" अश्वथरावाना मात्र उसंत नव्हती. निश्चिती नव्हती. कारण सत्यभामेस फार त्रास झाला. प्रसूतीनंतर ती जी बेशुद्ध झाली ती शुद्धीवरच आली नव्हती. त्यांच्या वडिलानाहि बरें नव्हते. डॉक्टरकडच्या खेपा वाढल्या आणि काळजीहि वाढत गेली. . .

—एक वर्ष लागलं सत्यभामेची स्थिति ताळ्यावर यावयास. तिचें सासरे गेल्याला एक महिना झाला होता. ती आपल्या यजमानाबरोबर डॉक्टरांच्याकडे गेली होती. प्रकृती नीट व पूर्ण तपासल्यावर डॉक्टर 'उत्तम झाली आहे तब्येत. आता कांही चिंता करण्याचे कारण नाही' असं अश्वथराव बोलले— आणि अश्वथरावाना उद्देशून डॉक्टर म्हणाले, 'मला तुम्हाला कांहीं सांगायचे आहे.' सत्यभामा बाहेर अश्वथरावांची वाट पाहत बसली. अश्वथराव आले तेव्हां त्यांच्या

चेहऱ्यावरची आभा पालटलेलीं होती. त्याना कष्टी म्हणता आले नसते तरी प्रसन्न नक्कीच म्हणता आले नसते. त्यामुळे सत्यभामाबाईना काय व कसे विचारावे याचा प्रश्न पडला. त्याना अशीहि शंका आली की, डॉक्टरनी त्यांची काया निकोप झाली असे जें सांगितले तें खोटे तर नव्हते ? पण तसे कांहीं वस्तुतः असते तर अश्वथराव नक्कीच दुःखी दिसले असते. त्यांची मुद्रा तशी नव्हती पण ती कसल्यातरी आव्हान वजा विचाराने झाकळलेली होती हे मात्र खरे—

एकदोनदा अश्वथरावानी टॅक्सींत वसल्या वसल्या सत्यभामाबाईंच्याकडे रोखून पाहिले तेव्हां त्या किंचित् लाजल्या पण त्यांच्या चटकन् लक्षांत आले कं, ते पाहणें 'तसे' नव्हते. अश्वथरावांशी त्या इतक्या दवून, जपून, भिऊन आणि अदवीने वागत की, त्याना अश्वथरावाना कांहीं चौकसपणे विचारण्याचे धैर्य झाले नाही. पण त्या दिवसानंतरहि त्यांच्या एकदम कांहीं लक्षांत आले नाही. परन्तु दोन महिन्यानंतर ते सर्व जेव्हां आपल्या नव्या घरांत राहावयास गेले तेव्हां एक गोष्ट त्याना खटकली. अश्वथरावानी आपली म्हणून झोपावयाची खोली केवळ एकटयाकरता राखून ठेवली. सत्यभामावाईना म्हणाले, 'मुलें वाढती आहेत. जाण येते आहे त्याना. प्रत्येकाला वेगळे झोपण्याची संवय निरोगीपणाकरता आवश्यक आहे–'

—सत्यभामावाई फार वेचैन झाल्या. तशी त्यानी तिशीहि ओलांडली नव्हती. पूर्ण विश्रांती आणि योग्य औषधोपचाराने त्यांची कळा सतेज आणि सुरेख झाली होती. विपुल केशसंभारास कुठेहि लपून बसलेल्या पांढऱ्या केसाचे गालबोट लागले नव्हते. अशा स्थितींत आपल्या जीवनसाथीचे आपल्यावरून लक्ष उडून जावे याचे त्याना कमालीचे वैशम्य वाटले. या वैशम्यांत तडफडत असतानाच अश्वथरावाना डॉक्टरनी त्यांच्या अपरोक्ष कांहीं सांगितल्याचा प्रसंग स्मरला आणि त्यांच्या मनाने वैद्यकीय सल्ल्याशी आपल्या नवऱ्याचे वागणे जोडले व त्यांना हायसे वाटले. आणखीन् कांहीं दिवस दक्षता घेणे आवश्यक असल्याचे डॉक्टरचे सांगणे असल्यानें आपल्या कल्याणाकरतांच अश्वथरावांचे असे वागणे आहे अशी त्यानी आपली समजूत घातली.

—ही समजूत फार काळ टिकूं शकली नाही. कारण एक वर्ष गेले, दुसरे वर्ष उजाडले तरीहि अश्वथरावांच्या त्यांच्याबरोवरच्या वागण्यांत फरक पडला नाही. उलट अश्वथराव ऑफिसांत जास्त काळ राहूं लागले. तेथून सरळ क्लवांत जात आणि रात्री उशीरां येत. प्रथम चपराशी येऊन सांगे. पुढें तेहि बंद झाले. तसं पाहिलं तर त्यांचा प्रपंच नेटका होता. सुरळित चालला होता. कुणाला कांहीं कमी पडत नव्हतं. हवं ते विनायास मिळत होतं. अश्वथराव चोख हिशोबाचे आणि ठोक व्यवहाराचे गृहस्थ होते. एक मजली घराचे आता चार मजले झाले. अश्वथरावांना बढती मिळाली होती. भरभराट होती. ठिगळ नव्हतं. लाचारी नव्हती. मान होता. प्रतिष्ठा होती. घरापुढील मोटार वैभव दाखवे. प्रत्येक गोष्ट अश्वथराव योजनेने करत, आखून करत, त्याचे हे फळ असे प्रत्येकजण कौतुकें.

—सत्यभामावाईना मात्र याचे समाधान नव्हते. सुख नव्हते. त्याना आपण नवरा हरवून वसलो याचे दुःख सतत सलत होते. त्याने त्याना पोखरले. मुलांच्याकरता त्या वरकरणी हसायच्या, खुशीत रहायच्या पण अंतरी विकल असायच्या. दिवसामागून दिवस गेले आणि त्यांची ही व्यथा घट्ट झाली. इतकी की, जेव्हां अश्वथराव वयाच्या ४३ व्या वर्षी अचानक हृदयविकाराने गेले तेव्हा त्यांचा दुःखावेग अनावर झाला नाही असे नव्हे तर त्याचा उद्रेकच झाला नाही. त्या गंभीर राहिल्या. शोकमग्न आप्तस्वकीय 'धीरशांत गंभीर स्त्री' असे उद्‌गारले. त्या मात्र पूर्ण अलिप्त राहिल्या. तटस्थ होत्या.

—लोकांच्या आणि खुद्द अश्वथरावांच्या घरच्या मंडळींच्या दृष्टीनेहि काळजीचे प्रयोजन नव्हते. अश्वथराव ज्या संपन्नतेनं राहत होते त्यावरून या घराच्या कमीतकमी दोन पिढयांना तरी भवितव्य भेडसावूं शकले नसते. चार मजल्याचे भाडेच नुसते घेतले तरी भरपूर होते. . . .

सत्यभामावाईनी सर्व सूत्रें हातात घेतली. हिशोवाच्या वह्या अठरा वर्षाच्या मुलास नीट तपासावयास दिल्या. जयंतानें एक दोन ठिकाणच्या किरकोळ देण्याचा (क्लव, एका मित्राचे रु. ५००) उल्लेख असल्याचे सांगितले. हे चालू असताना त्या तिजोरी तपासूं लागल्या आणि त्याना धक्के वसूं लागले. तिजोरींत त्यांच्या पाटल्या, नथ, चपलाहार, अंगठया इ. इ. नव्हते. फक्त शंभराच्या दोन नोटा होत्या आणि एका पुडींत चार नाजूक आणि सुंदर मोत्यांच्या बांगडया होत्या. एक बारीक घडयाळ होतं. घडयाळाच्या सोनेरी पट्ट्यावर लिहिलं होतं "प्रिय गुलावला 'अ' ची सप्रेम भेट."

सत्यभामावाईंच्या लक्षांत आलं की, पुडीच्या कागदावर कांहींतरी लिहिलं आहे. 'गुलावचा' पत्ता होता तो. सत्यभामावाईंचं डोकं सुन्न झालं. त्याना कांहीं सूचेना.—आणि जयंता सारखा म्हणत होता 'आई, बाहेर एक गृहस्थ आले आहेत. म्हणतात, कीं आताच तुझ्याशीं वोलायचे आहे.. . . . '

—सत्यभामावाई सावरल्या. बाहेर आल्या. वैठकींत उंच टोपी आणि बंद गळयाचा कोट घातलेले एक गृहस्थ वसलेले होते. त्याना पूर्वी बघितल्याचं कांहीं सत्यभामावाईना आठवेना. सत्यभामाबाईच्या येण्याने ते गृहस्थ उभे राहिले. वंदून अदबीने वोलले 'आपण धिराच्या आणि सौजन्याच्या म्हणून येण्याची हिंमत केली. कसं सांगावं कळत नाही. पण वेळींच नाही सांगितलं तर अगोदरच कां नाही सांगितलं असा संशय यायचा. दुसरं असं कीं, मी जे कांहीं सांगणार आहे ते सिद्ध करा म्हणजे मजजवळ पुरावा नाही. . . '

गृहस्थ थांवले. सत्यभामावाई निर्विकार होत्या. तें पाहून गृहस्थ पुढें म्हणाले, 'अश्वथरावनी गेल्या कांहीं दिवसांत मजकडून दहा हजाराच्यावर कर्ज घेतले आहे. अगदी मरायच्या अगोदर एक दिवस त्यानी माझ्या दुकानातून मोत्यांच्या बांगड्या आणि घडयाळाकरता सोन्याचा पट्टा नेला. . . आपल्याला मी म्हणत असलेलं खरं वाटलं तर, एकदम जमले नाही तर आस्ते आस्ते रक्कम चुकती करावी. . ,








सत्यभामा ऐकत होती. स्तब्ध होती. त्या स्तब्धतेतच कधी नव्हे तो तिचा चेहरा क्षणभर ऊजळला आणि आलेल्या गृहस्थास म्हणाली 'आपण मुळींच चिंता करू नका. मी आपले सगळे कर्ज फेडीन–'

–जयंत नुसता पाहत राहिला. तो गृहस्थ गेल्यावर म्हणालं, 'आई, नाही म्हणायचं, निदान ओळख द्यायला तरी सांगायचं–' सत्यभामा संथपणें म्हणाली 'कांहीं कां असेना, दिला शब्द पाळला पाहिजे–' आणि तिने शोफरला गाडी काढावयास सांगितले, त्या बांगड्या घेऊन ती गुलाबकडे गेली—

–गुलाबचे घर सापडले. गुलाबहि भेटली पण ती घाईत होती. घरापुढे मोटार थांबली होती. सामानाची बांधबांध झालेली दिसत होती. गुलाब निघण्याच्या घाईत होती. सत्यभामाबाईकडे एक रोखून कटाक्ष टाकला तिनें आणि मोकळेपणाने हंसली. आखडलेल्या आणि कसे बोलावे या पेंचात अडकलेल्या सत्यभामाबाई त्या हास्यानेच बाद झाल्या. गुलाब जणुं त्याना किती तरी वर्षे ओळखत आहे अशा जवळकीने म्हणाली 'मीच येणार होते परन्तु मग बेत बदलला. जे कांहीं सांगायचे आहे ते ह्या पाकिटांत आहे. मी हे गांव सोडून जात आहे—'

सत्यभामाबाई आवाक् राहिल्या. सारखे त्यांच्या विचारांना धक्के बसत होते. अपेक्षांना तडे जात होते. पाकिटांत एक पत्र होते आणि त्याला एक चेक जोडला होता. पांच हजारांचा होता. पत्र छोटेसेच होते. लिहिले होते 'मीहि एक विवाहित स्त्री आहे. ज्या माणसाशी माझे लग्न झाले त्याला एक असाध्य रोग असताना त्याने माझ्याशी लग्न केले. त्याला बायको एक प्रपंचाला व प्रतिष्ठेला शोभा म्हणून हवी होती. बायकोचे भांडवलहि करावयास हा इसम मागें पुढें पाहणार नाही असे मला जाणवताच त्याला सोडून मी ह्या गावी आले आणि अश्वथरावांची गांठ पडली. मला एक मुलगी झाली. अश्वथरावानी मजपासून कांहीं लपवून ठेवलं नाही. मी विचारलं नाही पण त्यांनी दिलं. मुलीकरतां सोनं दिलं. जे पैसे दिले त्यांतले वाचवलेले मी परत करत आहे. अश्वथरावानी मजकरता जे घर बांधून दिले आहे त्याच्या भाड्यावर आमची उपजिवीका चांगली चालेल. या पृथ्वीतलावर जन्मलेली आपण माणसे कुठें कां जन्मलों हें जसे सांगता येत नाही तद्वत केव्हां आणि कुठे जाऊं हे पण वर्तवता येत नाही. . . '

–आणखीन तीन चार ओळी लिहिल्या होत्या पण सत्यभामाबाई येथेंच अडल्या. . . . . .

●●●

दरवेळी तो लग्न ठरवीत होता. आणि लगेच नकारही कळवीत होता. तो पोरकट होता ? वेडा होता ? त्याला वैराग्याचे झटके येत होते ? छे : छे : ! ! .......



# अज्ञात हितकर्ता

[ चित्तथरारक सत्यकथा]

—बाबुराव कामत

**बावीस** वर्षे पूर्ण झाली या गोष्टीला! हां, हां, म्हणतां हा दीर्घकाल केव्हाच निघून गेला! वर्षे किती झराझर जातात?

तारीख १४ एप्रिल १९४४ हा दिवस मुंबईकरांच्या फार वर्षे स्मरणांत राहण्यासारखाच आहे! पूर्वी कधी झाला नाही असा हाहा:कार त्या दिवशी मुंबईत झाला! नानातऱ्हेच्या कंड्या, अफवा पसरल्या. शेकडो गुजराथी मुंबई सोडून पळत सुटले! दोन वर्षापूर्वी असेच कंड्या—अफवा व भ्रामक समजुतीमुळे हजारो लोक मुंबई सोडून पळून गेले होते; ते नुकतेच परत मुंबईस आले होते. आपण उगीच मुंबई सोडून पळालो याचा खेद करणारे, आपण उगीच परत आलो म्हणून खेद करू लागले!

त्या दिवशी दुपारी साडेचारच्या सुमारास मुंबईतील गोदीत उभ्या असलेल्या परदेशी मालवाहू बोटीवर आग लागून प्रचंड स्फोट झाला. सबंध मुंबई बेटाला हादरा बसला. मुंबईपासून ३५ मलांच्यावर असलेल्या कल्याण शहरात, आभाळात ढग गडगडावे या प्रमाणे जो आवाज आम्हाला ऐकू आला, तो आवाज जाग्यावर किती भयंकर असेल याची कल्पनाही करता येत नाही. मुंबई अग्नीशामकदल व मुंबई शहर पोलीस यांतील शंभराहून जास्त कर्तव्यतत्पर नोकर या स्फोटात ठार झाले. कोण कधी व कसा मेला याचा त्याच्या शेजारी उभ्या असलेल्या [illegible] माणसालाही पत्ता लागला नाही. काहीजणांच्या अक्षरशा चिंध्या झाल्या! कोणी अस्मानात उडून समुद्रात जाऊन पडले. त्यांची प्रेते कैक मैल लांब वाहून गेली. नंतरची गोदीतील दृश्ये फार भेसूर होती. त्यांचे वर्णनहि करणे नको! भरून आलेल्या जखमा पुन्हा उकरून पहाण्यात शहाणपणा नाही!

स्फोटानंतर सबंध गोदी भाग जनतेस किती तरी दिवस बंद होता, तेच योग्य होते! कारण जरा कुठे खुट् झाले की, "क्या हो गया—क्या हो गया" करीत नको तिथे नाक खुपसण्यास धांवणारे मुंबईचे अति उत्सुक मूर्ख, त्या ठिकाणी गेले असते तर तिथल्या भीषणदृश्याने त्यातील अर्धे तिथेच बेशुद्ध झाले असते!

ज्या आगबोटीत स्फोट झाले ती परदेशी मालवाहू बोट दारूगोळ्यानी व स्फोटक बॉम्बनी भरलेली होती. पण बोटीत कसला घातुक मालमसाला भरलेला आहे याची कोणालाच कल्पना नव्हती. पोलीसांना पण नव्हती. व आग





अनुक्रमणिका

घिझवणाऱ्या बंबवाल्यानाही नव्हती. अगदी निर्धास्तपणे ते विचारे आपापली आयुधे उभारून कामास लागण्याच्या तयारीत होते. हा एक अपघात होता अशीच फार वर्षे लोकांची समजूत होती; पण नंतर आतां उघडकीस आले आहे (असे म्हणतात) कीं, ब्रिटिश सत्तेस हादरा देण्याच्या सुभाषबाबूंच्या कार्यक्रमात अंदमानात उभारलेल्या घटनेत शिकून तयार झालेल्या एका कोकणी मराठ्याने मजुराच्या सोंगाने गोदीत प्रवेश मिळवून ठराविक कार्यक्रमाप्रमाणे स्वतःचा जीव घालवून बुद्धिपुरस्सर ही आग मुद्दाम लावली होती व स्फोट घडवून आणला होता. याबद्दलचा एक लेख दोन तीन वर्षापूर्वी मी कुठल्यातरी मासिकात वाचला आहे. या घातपाती कृत्याने ब्रिटिश सत्तेस कितपत हादरा बसला असेल कोण जाणे, पण शेकडो आईबाप बहीणभाऊ, पत्नीमुले आपल्या प्रिय माणसास मुकली व धायधाय रडली, हे मात्र खरे! अनेक निरपराधी जीव हासभास नसता उडून गेले!

त्या दुर्दैवी अकरा पोलीस कर्मचाऱ्यात माझा एकुलता एक धाकटा भाऊ कै. बाजीराव कामत हा एक होता. मुंबई शहर पोलीसात तो सब–इन्स्पेक्टर होता. त्याचे वय त्या वेळी ३२ वर्षाचे होते. प्रिन्सेस स्ट्रीट, डिलाइल रोड व किंग्ज सर्कल ह्या पोलीस स्टेशनात नोकरी करून स्फोटापूर्वी अगदी थोडे दिवसच तो गोदीतील "यलो गेट" पोलीस स्टेशनवर बदलून आला होता. काळानेच त्याला मारण्यासाठी अचुक तिथे नेऊन ठेवले होते, असेच म्हणावे लागते!

विशेष सांगण्यासारखी गोष्ट निराळीच आहे. आपले मरण अपघाती होणार आहे अशी फार वर्षे त्याची भावना होती. पण ते किती वयाला याची मात्र कल्पना त्यावेळी त्याला नव्हती; पण तीही सूचना त्याला फार चमत्कारिक रीतीने मिळाली. १९४१ च्या सुरुवातीस त्याला पहिली सूचना देण्यात आली की, तुझे आयुष्य फक्त तीन वर्षेच आहे! त्यानंतर दीड वर्षाने तुझे आयुष्य दीड वर्षेच आहे असे सांगण्यात आले व ऑगस्ट १९४३ मध्ये त्याला शेवटची सूचना मिळाली ती अशी की, 'तुझे आयुष्य फक्त आठ महिनेच आहे!'

या सर्व सूचना एका विशिष्ट प्रसंगीच मिळाल्या होत्या व त्या सर्व एकाच अतिवृद्ध भगवी वस्त्रे परिधान केलेल्या साधूने स्वप्नांत दिलेल्या होत्या. ही गोष्ट त्याने मला प्रथमच व शेवटची ऑगस्ट १९४३ मध्ये सांगितली.

आमचे वडील हयात असतां प्रथम बाजीरावाचे लग्न ठरले व बाकी सर्व प्राथमिक गोष्टी पक्क्या होऊन फक्त लग्नतिथी निश्चित करण्याचे बाकी असता त्याने वडिलांस कळविले की, काही महत्त्वाच्या कारणामुळे मला लग्नाचा विचार सोडून द्यावा लागत आहे व तसे तुम्ही खेदपूर्वक वधुपक्षास कळवा व तुमची निराशा केल्याबद्दल आपणास क्षमा करा. त्याचे कारण तो सांगेना तेव्हा त्याबद्दल चौकशी करण्यास वडिलानी मला लिहिले. आम्हा दोघा भावात पुरे सात वर्षांचे अंतर असूनही आमचे कुठलेच रहस्य दुसऱ्यापासून गुप्त नव्हते. त्यावेळी नोकरीनिमित्त मी मुंबईपासून खूप लांब होतो. त्यामुळे ही चौकशी मला पत्राद्वारेच करावी लागली. त्याने मला लिहिले की, ते कारण असे विचित्र आहे की, तुम्ही मंडळी मला फक्त हंसाल; म्हणून पुढे केव्हां तरी मी ते कारण तुला सांगेन. कारण त्यावेळी तूं हंसणार नाहीस! या आश्वासनावर विसंबून गप्प राहणे भाग होते!

२ मे १९४१ रोजी आमचे वडिल वारले व लग्नाचा प्रश्न तूर्तास मागे पडला. १९४२ च्या मध्यावर आपण लग्न ठरवत असल्याचे त्याचे पत्र मला आले व मी तत्काळ माझी संमति कळवली. तो शक्य तितक्या लौकर संसारात पडावा हीच माझी इच्छा होती. पण आठदहा दिवसांत मागचीच पुनरावृत्ती व लग्नाचा विचार सोडून दिल्याचे पत्र आले. कारण तेच जुने व मागचे!

हा एक वेडाचा नवा प्रकार आहे असे मानून मी तिकडे लक्षच दिले नाही. १९४३ चा पावसाळा सुरू झाला असेल आणि माझा भाऊ मला भेटण्यास आला. मी त्यावेळी अहमदनगरास होतो. आता आपण लग्न पक्के ठरवल्याचे त्याने सांगितले व वधूबद्दल माहितीही दिली. पूर्वीच्या दोन वेळाप्रमाणे आठच दिवसांत त्याचे पत्र आले पण ह्या खेपेस लग्न रद्द केले नव्हते; तर काही महिने स्थगित केले होते.

—ऑगस्ट महिन्यात मी मुंबईस येऊन त्याची भेट घेतली. माझा तो उपवासाचा दिवस होता व वर्षातून मी तीनचारच उपवास करतो. आषाढी-कार्तिकी एकादशी, महाशिवरात्र व दत्तजयंती. ह्या वरून मी म्हणतो की, ही गोष्ट आषाढी एकादशीची.

त्या रात्री भावनांचा पूर उफाळून येऊन मला जवळ बसवून, प्रत्येक लग्न ठरल्या वेळी आपणास पडणारे विचित्र स्वप्न, स्वप्नात येणारा तोच तो वृद्ध साधू, त्याने दिलेल्या सूचना ही सर्व हकीगत त्याने मला इत्थंभूत सांगितली व शेवटची सूचना मला पत्र लिहिण्यापूर्वी दोनतीन दिवस अगोदर मिळालेली असून त्याप्रमाणे आपल्या आयुष्याची मुदत आठ महिन्यांची असल्याचे सांगितले.

हंसण्यावारी नेण्यासारखी ही गोष्ट खासच नव्हती! 'आज रोख उद्या उधार' अशी एकाद्या दुकानांत कायमची लटकावलेली ती पाटी नव्हती! संपलेला काळ वजा करून, पुढचा काळ मोजून सांगितला जात होता! हा नुसता भास नव्हता! ह्यांत काही तरी अर्थ होता, तथ्य होते, शिस्त होती!!

म्हणून कल्याण येथे जेव्हा मुंबई शहर पोलिसांकडून तारा व निरोप आले व धांवत मी मुंबईला गेलो तेव्हांच मी खूणगांठ बांधली होती की, त्या वृद्ध साधूचे भविष्य खरे ठरले आहे व गायब झालेला माझा भाऊ स्फोटात मारला गेला आहे! कारण स्वप्नांत दिलेली आठ महिन्यांची मुदत भरली होती!

उध्वस्त झालेला गोदीचा सर्व भाग भटकून, तपासून आम्हाला तो मृत देहही सांपडलाच नाही. ती भयंकर दृश्ये पाहून मी मात्र नंतर आजारी पडलो!

मला नवल वाटते ते हे की, तीन वेगवेगळ्या तरुण सौभाग्यकांक्षिणींचा हा अज्ञात हितकर्ता कोण? ज्याने अल्पायुषी माणसास लग्नापासून थांबवले!










"लेकराचा हात धरून माझ्या घरांत आली आहेस, चुकले असेल त्याचें तर संभाळून घे, ओटी भरतेय तुझी ती पावून घे,..."



--सुरेश वेंगुर्लेकर



**आपण** काय करतो आहोंत हे समजण्यापूर्वीच त्याने ते केले नी मग तो तिथून धूम पळत सुटला.

त्याने जे केले तेही अशा सफाईने की, त्याच्याच बरोबर असलेल्या तळवडेकरांच्या बाबीलाही त्यानें खरें खरें काय केले याचा पत्ता लागला नव्हता. अचानक तो पळत सुटला म्हणून बावीही त्याच्यामागें त्याला हांका मारत धांवत राहीला. त्याच्या मागनं धांवताना हातांतले कांहींतरी त्यानें खिशांत कोंबलेन् तेवढेंच काय ते त्यानें पाहीले.

त्याच्या पळण्याचा वेग सुद्धां इतका जोराचा होता कीं, बाबीला कुठल्या कुठें मागें टाकून तो चाळीशीं त्याच्या पोहोंचला सुद्धां. चाळींत पोहोंचल्यावर मात्र तो अडला. असेच घरांत शिरावें कीं नाहीं त्याला प्रश्न पडला. त्यानें मग सरळ संडासाचीच वाट धरली.

संडासांत शिरून आंतून कडी लावून घेतली नी तो चीप उभा राहीला.कुठंच कसला आवाज होऊं न देतां. खिशांत घातलेला एक हात खिशांतूनच मांडीवर घट्ट दाबून धरीत. नाकपुड्यांनीं जोरजोरानें श्वासोच्छवास करीत.

संडासांतल्या खिडकीच्या कट्ट्यावर विडीचं थोटुक पडलं होतं. हवेंत धूराची रेष सोडत राहीलं होतं. बंद संडासांत धूर तो कोंडत होता. इथल्या घाणवासांत मिसळलेला विडीच्या धूराचा हा वास त्याला भारी आवडायचा. संडासांत जरा बऱ्या जागीं पडलेलं विडीचं थोटूक दिसलं म्हणजे तर त्याला परब्रह्म सांपडल्याचा आनंद व्हायचा.

या घटकेला मात्र त्या परब्रह्माचा आस्वाद घेण्याच्या मन:स्थितींत तो नव्हता. उलट जोरज़ोरानें श्वासोच्छवास करताना त्याला घुसमटल्यासारखे होऊं लागले. त्यानें मग खिडकी संडासाची थोडी किलकिली केली. फट झाली तसा वारा आंत घूसला. कोंडलेला धूर वेडावांकडा हालला. मग उघड्या फटीतनं हळू हळू बाहेर जाऊं लागला. विडीचे ते थोटुक सुद्धां त्यानें बाहेर उडवून दिले.

धूर पुष्कळसा कमी झाला. त्याला बरें वाटले. धांवल्यानें धांप लागली होती. तीही आतां थांबली. खिशांत दावून धरलेला कागदाचा लिफाफा त्यानें बाहेर काढला.

लिफाफा उघडला. डोळ्यांतली बुवुळं आपल्या एकदम कांचेची झाल्यासारखी वाटली त्याला. पोटांत कसे एकाएकी गलबलून आल्यासारखें झाले. आंत कितीतरी नोटा होत्या. मोठ्या. शंभराच्या.

तशी शंभराची नोट पूर्वीही एकदां त्यानें पाहिली होती. बापाच्या पगाराच्या दिवशी. बापानें त्याच्या ती वाण्याकडून मोडून घेतली होती. तोही तेव्हां बापाबरोबरच होता. ती मोठी हिरवी नोट हातांत घेऊन नीट पहावी अशी त्याला तेव्हां फार इच्छा झाली होती. पण बापा-












अनुक्रमणिका

कडे असले कांहीं विचारण्याची सोय कुठें होती?

या क्षणीं मात्र ती मोठी हिरवी नोट त्याच्या हातांत होती पण त्याची नजर तिच्यावर ठरत नव्हती. भीत भीत लिफाफ्यांतलीं एक नोट त्यानें बाहेर ओढली. हात त्याचा थरथरूं लागला तशी घाईनें पुन: ती त्यानें आंत लोटली. लिफाफा वंद केला. खिशांत कोंबून डोळ्याआड केला.

आयुष्यांतली त्याच्या ही पहिलीच चोरी होती असें मुळींच नव्हते. उलट पहिली चोरी केली होती—तेव्हां-पासून कुणाचे काहींना काहीं हातोहात् लांबविल्याशिवाय फार वेळपर्यंत जीवाला त्याच्या स्वस्थता लाभतच नसे. मात्र या चोरीच्या उद्योगांत चोरीच्या वस्तुला त्याच्या लेखीं फारसे महत्व नव्हते. अमकी तमकी वस्तु आपल्याला हवीच आहे म्हणून चोरी कधी त्यानें केलीच नाहीं. आनंद जीवाला त्याच्या कुणाचे कांहींतरी पळविल्याचा. ध्यास होता तो चोरीच्या क्रियेतल्या धाडसाचा. वस्तु किती मोलाची याची फिकीर नव्हती. चोरी जितकी अवघड तितकी तवियत त्याची अधिक खूष—असे हें गणित होते.

म्हणूनच आजवर त्यानें चोरलेल्या वस्तुंची यादी फालतू वस्तुंचा समावेश असलेलीच होती. पुस्तकें, चपला, पेनें, कानकोरणें, टायपीन, वर्गातल्या मुलींच्या शेपटाच्या रिबीनी. . . अशाच कसल्या कसल्या वस्तुंची त्यांत भर होती. कुणाचे पैसे चोरण्याची बुद्धि आजवर त्याला कधीं झाली नव्हती.

खुद्द तेलंग मास्तरांचे पैशाचे पाकीट एकदां त्यानें दडवले होते हे खरे. पण त्यावेळीं सुद्धां मोह पैशाचा नव्हताच. मास्तरांच्या या पाकिटांत मीनाकुमा-रीचा फोटो असल्याचा शोध त्याला लागला होता. नी मग दोस्त राष्ट्रासमोर पुराव्यासहीत हा शोध सिद्ध करण्याची जबाबदारी त्याच्यावर आली होती. जिद्दीनें त्यानें मास्तरांच्या खिशांतले पाकीट उडवले. मित्रांच्या टोळक्यासमोर त्यांतून मीनाकुमारीचा फोटो काढून सर्वांना चकीत केलेन्. नी मग काम झाले तसे पाकीट मास्तरांचे आपल्याला शाळेच्या जिन्यांत सांपडलें कसे सांगून त्यांचे त्याना त्यानें परत केले. आंतल्या दिडकिलाहि न शिवतां. मीनाकुमारीचा फोटोसुद्धां अगदी आठवणीनें पुन: आंत ठेवून.

अगदीं आजसुद्धां जे घडले ते घडेपर्यंत पैसे चोरण्याचा विचार मनाला त्याच्या शिवला नव्हता. तळवडेकरांचा बाबी आणि तो सिगारेटीची रिकामी पाकीट शोधत रस्त्यांतनं हिंडत होते. बॅंकेसमोर फूटपाथला लागून एक टॅक्सी उभी होती. फूटपाथ आणि टॅक्सीच्या मध्यें कॅप्स्टनचे एक रिकामे पाकीट पडलेले बाबीला दिसले. पाकीटावर बाबीनें झडप घातली. तो नुसताच जवळ त्याच्या उभा राहीला.

याचवेळीं बॅंकेतनं सूटाबुटांतला तो इसम बाहेर आला. घाईनं टॅक्सीत बसला. आंत बसतां बसतां कोटाच्या खिशातनं रूमाल बाहेर काढून त्यानें चेहरा टिपला. तो रुमाल बाहेर काढताना कागदाच्या लिफाफ्याचं टोंक जरा कुठें बाहेर डोकावलं. नजर त्याची तिथं गेली नी त्या लिफाफ्याच्या टोकानं क्षणांत त्याला कधीं आव्हान दिलं. मग हात त्याचा विजेच्या वेगानें त्या खिशावरून फिरला. टॅक्सी सुरूं होऊन तो इसम गेला सुद्धां नी मग त्याच्या लक्षांत आले—त्याच्या खिशांतला तो कागदी लिफाफा या इथं. . . आपल्या हातांत आहे. हे सुद्धां लक्षांत यायला क्षण कांहीं मध्यें संपावे लागले. पण ते लक्षांत आले नी मग मात्र त्यानें तिथून धूम ठोकली. चाळ जवळ करून संडासांत स्वत:ला असे लपवून घेतले.

इतक्या वेगानें सगळें असे घडून आले होते. तो कागदी लिफाफा प्रत्यक्ष हातीं पडला होता तरी पैशाच्या विचा-रांचा कुठे मागमूस सुद्धां नव्हता. नी तो लिफाफा त्यानें आतां उघडला होता तर आंत साऱ्या नोटा शंभराच्या.

ही कांहीं भलतीच आफत आली होती. आजवर चोरलेल्या वस्तु मामुली होत्या. विल्हेवाट त्यांची कशी लावायची असा प्रश्न कधीं उद्भवला नव्हता. पुष्कळदां तर त्या कुणाला ना कुणाला देऊन टाकण्यानेंच हा प्रश्न मिटत होता. असल्या दानानं चोरीचा मूळचा आनंद आणखीच लठ्ठ होत असे. पण या लफ-ड्यांत असली कांहींच सोय त्याला दिसत नव्हती. एकंदर सगळे सालें मोठें कठी-णच होते.

एक तर एवढ्या पैशांचे करायचे काय? नी कांहीं करायचे म्हटलें तर एक एक नोट आधीं मोडून आणायला हवी. आईला त्यानें एकदां का दोनदां पांच रुपयांची नोट चाळीखालच्या हॉटेलांतून मोडून आणून दिली होती. पण दोन्ही वेळेला आई त्याची तो मोड घेऊन येई-पर्यंत चाळीच्या जिन्याशीं वाट पहात उभी राहीली होती. नी दुसऱ्या वेळेला तर गल्ल्यावरच्या रामण्णाच्या पाहुण्यानें त्याच्याकडे संशयी नजरेनेंच पाहीले होते. हा असला अनुभव शंभ-राची नोट मोडण्याच्या प्रयत्नाला स्फूर्ति देणारा खचीतच नव्हता.

शिवाय आजवरच्या वस्तु अमक्या तमक्याला देऊन टाकाव्या असे जे त्याला वाटत असे तसे हे पैसे कुणाला तरी देऊन टाकण्याजोगेही त्याला कुणी सूचेना. नाहीं म्हणायला एक माणूस तेवढा पुन: पुन: डोळ्यासमोर येत होता. ज्याचे हे पैसे त्यानें चोरलेन् होते तो स्वत:च. खरंच त्यानें हे पैसे परत घेत-लेन तर केवढे बरे होईल! असा सुद्धां विचार त्याच्या मनांत आला. पण मग दुसऱ्याच क्षणीं त्यातले सगळे धोके त्याला जाणवले नी तो हादरलाच.

चाळींत त्याच्या नांवानें हांका सुरू झाल्या. आणि त्याला एकदम मुताय-लाच झाले. त्यानें अंदाज घेतला. हांका मारणाऱ्यांत बाबी होताच. साल्यानें

चाळींत बोंब तर नाहीं केली? पण दुसरे दोघी त्याच्याच बहीणी होत्या. या पलिकडे कांहीं चौथा कुणाचा आवाज ऐकूं येत नव्हता. म्हणजे बाबीनें हे प्रकरण त्याच्या घरापर्यंतच फक्त पोहोंचवलेन् होते. पण घरापर्यंत ते पोहोंचले होते म्हणजे तरी काय? छे, चाळींत कुठें थांबणें आतां धोक्याचेंच होते. काय करावे त्याला कळेना. हे असे संडासांत तरी किती वेळपर्यंत दडून रहायचे?

बाबी आणि त्याच्या बहीणी त्याच्या नांवानें ललकारा करीत संडासावरून पुढें गेलीं तसा तो हळूंच कडी काढून बाहेर आला. लगबगीनें जिना जवळ करण्याच्या तो बेतांत होता. तेवढ्यांत धाकटीनें नेमकें कुठें वळून पाहिलेन्, नी ती ओरडली–

"अग्गो बाई हा बघ कुठून आला तो. ."

तशीं बाबी नी थोरलीहि गर्रकन् मागें वळली. त्याला त्यांनीं गांठलेंच.

"कुठूनं आलास रे?"

"आलो गाढवाच्या गांवावरनं.

"च्यायला काय सूऽऽम्म पळालास रे किशा तूं. काय सांपडलं रे तुला?"

"टांग तुझ्या नानाची."

"टांग काय. हातांत होतं तुझ्या काय-तरी. माझ्या डोळ्यांनी पाहिलं मी."




"बापाचं नव्हतं ना तुझ्या कांहीं?"

असल्या बोलण्यानें त्याचा बाबी वरमला. याला असे एकदम चिडायला काय झाले त्याला कळेना. थोरलीलाही हे बोलणे त्याचे वावगें वाटलें. म्हणाली–

"नसेल सांगायचे तुला तर नाही कां सांगेनास. पण उगाच बाप का काढतोस कुणाचा?"

"तूं उगाच्या उगाच चिचूंद्रीपणा करू नकोस मुमे–नाहीं तर लाफा खाशील बघ एक."

"आला मोठा लाफा मारणारा. आईच तुला बोलावतेय. चल आधीं-लाफा खायला."

थोरली त्याला पक्के ओळखून होती. सावध होती. हात उगारलान त्यानें. पण आधींच ती दोन हात दूर झाली होती. धाकटीला अजून एवढा पोच नव्हता. त्याला जीभ काढून दाखवलीन नी पळायचं विसरली. थोरलीचा रट्टाही मग त्यानें हिलाच हाणला. ती बोंबटली–

"आये ऽऽ किशादानें मारलें ग ऽऽ..."

इतकें झाल्यावर आईच दारांत आली. त्याला मग घरांत शिरणेंच आले.

"माजलाहेत तरी कशानें मेल्या मार-लेस ते तिला. नी होतास कुठें इतका वेळ ?"

"मुतायला गेलो होतो."

"इतका वेळ मुतायला? मेला रावणच लागून गेला की नई"

आईला त्याच्या ही एक खोड ह
कांहींहि घडो ही आपली रावणाला वेठ
घरायची. तिच्या दृष्टीनें वाईट असणाऱ
न आवडलेल्या कुठल्याही गोष्टीचा र
णाशीं संबंध जोडायची. नाहीं तर या
मुतण्याचा नी रावणाचा एरव्ही सं
काय? -

आतां पुनः एकदां बाबीकडे बोट क
ती म्हणाली–

"हा तुझा दूत लंकेचा काय सांग
आहे रे?"

"काय सांगतोय ?"

"बघ, बघ. रावण मेला. मल
विचारतोय पुनः काय सांगतोय म्हण
कुल्याला पाय लावून पळून आलात
कुठून? काय झालं होतं रे पळायला?"

"काय नाय. उगाच."

"कानपटीन बघ किशा. रस्त्यात
उगाचचं धावायला खूळ लागलं हे
कां वेड रे तुला. काय झालं ते खरं स
बघूं बाबी."

"मला काय माहीत. किशा पळा
म्हणून मी पळालो. पण किशाच्या हाता
मात्र काय तरी होतं किशाच्या आई."

"काय होतं रे रावणपुता?"

"काय नाहीं."

"वारे किशा. खिशांत ठेवलंस कायत
ते माझ्या डोळ्यान्नी बघीतलं मी."

बाबीकडे त्यानें एक असा जळजळी
कटाक्ष टाकला. नी आईनें त्याच्या त
नेमका पकडला. काड्कन् त्याच्या ए
मुस्कटांत वाजवली.

"काढ आधीं खिशांत काय आहे ते."

खिशांतला लिफाफा काढून मुका
त्यानें आईच्या हातावर ठेवला.

लिफाका उघडलान तिनें नी काळजां
तिच्या धस्स झालें. शिवाय आणि बाबीहि
ओरडला—

"आयला! पैसे दिसतायत."

घाईनें तिनें नोटा आंत लोटल्या लिफाफा बंद करून पदराआड केला पण बाबी आता तर्क सांधू लागला.

"च्यायला बरोबर!"

"काय म्हणालास रे बावी?"

"आपल्या हीते ती ब्यांक नाहीं का बांधलीय नवीन...."

"बांधलीय मग?"

"त्या ब्यांकेसमोर एक टॅक्सी उभी होती........."

"तिचे काय झाले.....?"

"तिचे काय नाहीं झाले. आतनं एक माणूस बाहेर आला..."

"टॅक्सीतनं?"

"नाहीं व्यांकेतनं. सूटबूट घातलेला. टॅक्सीत बसला नी निघून गेला."

"हात मेल्या. तो गेला तिकडे कुठें लंकेला नी त्याचे केव्हांचे काय सांगतो आहेस मला?"

"मी म्हणतो त्याचेच हे पैसे पडले बिडले असतील तर....."

"तर, तर मोठा रावणाच्याच डोळ्याचा कीनई तूं सुद्धां. असे रस्त्यांतून टाकण्या-साठीं व्यांकातून पैसे ठेवतात होय रे लोक. तरी बरें किशानें आमच्या चोरले बिरले म्हणाला नाहींस ते....."

मग ती एकदम पुनः किशावरच घसरली.

"तुला मेल्या हज्जारदां सांगितलं मी या असल्या पोरांच्या नादीं लागूं नकोस म्हणून. कधीं कसला आळ घालतील मेलीं सांगतां यायचं नाहीं. थांब तुलाच धरून मुतेस्तवर तिवून काढते आज. त्या-शिवाय दोस्ती असली दळभद्री तुला सुटायची नाही.....'

नी मग कोपऱ्यांतली केरसुणी उचलून पायावर त्याच्या तडाखे हाणायला तिनें सुरवात केली. एक...दोन...तीन.. थोडें थांबून मग तिनें वळून पाहीलेन्. बावीनें तिथून पाय काढला होता. घाईनें केरसुणी तिनें कोपऱ्यात फेंकली. नी दार आड करून आधीं कडी घालून टाकली. मग त्याच्या जवळ येऊन खालच्या आवाजांत तिनें विचारलेन्.

"मेल्या केले आहेस तरी काय हे?"

त्या तसल्या आवाजांतला आईचा तो प्रश्न त्याला भयानक वाटला. हा तिचा आवाज त्याला परिचयाचा नव्हता. त्याचा द्वेष करणारा... निषेध करणारा तो आवाज नव्हता. त्यांत कुठें तरी त्यालाच सामील होण्याचा पवित्रा होता. त्याला ते बरें वाटले नाहीं. यापेक्षां आई केरसुणीनें हाणत होती तेंच ठीक होतें. तिनें असे कांहीं आपल्याला विचारू नये. त्यानें तिच्या प्रश्नाला उत्तरच दिलं नाहीं.

तिलाही उत्तर हवेच होते असे नाहीं. ओळखायचें ते सारे तिनें ओळखले होते. म्हणाली——

"करावें तरी काय बाई या असल्या पोराला. आज पैसे चोरलेन् उद्या बायको पळवायचा एखाद्याची—त्या लंकेच्या रावणासारखी."

या तिच्या बोलण्यांत तर बिलकूलच कुठें दम नव्हता. संशय त्याच्या मनांतला आणखीच वाढला. एरव्ही एवढें कांहीं झालें कीं त्याला ती आधीं पुरेशीं कुटून काढायची. कुटतां कुटतां त्या कुटण्याला ताल धरल्यासारखी तोंड वाजवत रहायची. त्या दृष्टीनें आजच्या त्याच्या गुन्हयाचें स्वरूप लक्षांत घेतां खरें म्हणजे











अनुक्रमणिका

तिनें कमालीचे रूद्र रूप धारण करायला हवें होते. त्याची पाठ. . . .पाय, थोबाड हाताने फोडून काढताना नी जीभेनें शब्दांच्या लाह्या उडवताना खरं म्हणजे या क्षणीं तिला उसंत असायला नको होती. पण प्रत्यक्षांत वागणें तिचे निराळेंच होत राहीले होते.

त्यानें पाहीलें. आई त्याची खिडकीशीं कांहीं बाही करत होती. जुन्या पातळाचे धडोते फाडून कधीं काळी खिडकीला तिनें केलेले पडदे. पण मग घरांत काळोख होतो म्हणून थोरलीच्या रिबनींनीं ते जे ऐकदां बांधून ठेवले होते त्याला वर्ष किती झाली होती तिची तीच जाण. ते पडदें या क्षणीं ती सोडत होती.

खिडकीवरून पडदे ओढून घेतल्यावर पुनः एकदां तिनें घराकडे पाहीले. सगळीकडून नीट झाकपाक झाल्याची खात्री करून घेतलीन् नी कोपऱ्यांतल्या देवापुढच्या काळोखांत निरांजन पेटवून तेवढ्यापुरता उजेड केला. पदराखालनं लिफाफा काढून त्या उजेडांत ती लिफाफ्यांतल्या नोटा मोजूं लागली.......

सुमी बोलून गेली——

"अग्गोऽऽ बाई. केवढे गे हे पैसे आई!"

"फोडलेस कां डोळे तुझे. जळ्ळ मेलीचं लक्षण ते. जरा तिकडे चुलीला पोतेरे करशील तर तू झिजायची नाहींस कीं चूल-मातायची नाहीं हो. जिथें तिथें मोठ्यांत लुडबुड मेलीची."

म्हणजे इतका वेळ तोंडाला कुलूप घातलेन त्याचे कांहींच नाहीं. फणकाऱ्यानें थोरली चुलीशी शिरली. धाकटीलाहि तिनें आपल्याबरोबर ओढले.



पण अजूनही आई कुणाला तरी बोलतच होती. त्यानें पाहीले लिफाफा तिनें देवासमोर ठेवला होता. त्याच्याशींच तिचे कांहीं चालले होते. म्हणत होती—

"सांगून ठेवतेय तुला. मी काय हीला बोलवायला गेले नव्हते. आपल्या पायानें घरांत माझ्या ही लक्ष्मी चालत आलीय. तिनें कसल्या रूपानें यायला हवें होतें ते तिचें तिला तूंच विचार. मी काय तिला माझ्या हातानें बाहेर काढायची नाहीं."

हे आणीक काय नवीन? नी ही लक्ष्मी कोण ? नी ती या भलत्याच वेळेला कुठें आईला आठवलीय ? त्याला कांहींच कळेना.

पण तेवढ्यांत दारावर आवाज झाला. आईनें त्याच्या केवढ्यांदा दचकून अंग काढलेन. घाईने मग तिनें देवासमोरचा लिफाका उचलला. पुनः पदराआड केला. पदर नीट केला. ओढून घेतलेले खिडकीवरचे पडदे पुनः होते तसे सरकवले नी त्याना ती रिबीनी बांधत होती तर पुनः जोरानें दार वाजले.

दुसऱ्यांदा दार वाजले म्हणून तो दाराच्या दिशेनें हालला तर आई केवढ्यानं डाफरली.

"थांब तिथेंच आधी. हाललास तियनं तर तंगडीच मोडीन मेल्या."

तो मग तिथेंच थांबला. नी आई त्याची दार उघडायला गेली. पण दार न उघडतांच पुनः ती मागें फिरली. त्याच्याजवळ येऊन मघाच्याच त्या भयानक खालच्या आवाजांत म्हणाली——

"तूं मुकाट माळ्यावर जाऊन बैस जा कसा. नी मी बोलावल्याशिवाय खाली उतरशील तर याद राख."

त्याच्याकडून कांहीं गैर घडले कीं या माळ्याचा त्याला नेहेमीच मोठा आधार वाटे. नी आता तर आईच त्याला सांगत होती वर जाऊन बस जा. विनाविलंब माळ्याच्या शिडीच्या पायऱ्या तो चढून गेला.

मग तिनें दार उघडलेन. दारांत त्याचा बाप होता. कामावरून परतला होता. कावला होता. अंत शिरत म्हणाला—

"साले गरम काय होतेय नी रांडेच्यानो दारे लावून करताय काय घरांत."

तरी आईनें त्याच्या पुनः दार बंद केलेच. बाप त्याचा यावर चांगलीशी शिवी योजूनच बोलूं ईच्छीत होता-पण आईनें त्याच्या घाई केली. डोळे मोठे केले. नाकावर बोट उभे केले. मोठ्यानें 'शूऽऽ' असा आवाज केला. एवढ्यानें किशाच्या बापाने सणसणींत शिवी हांसडण्याच्या पहिल्या वेताला मुरड घातली. क्षणभर तो किशाच्या आईच्या अभिनयाकडेच पहात राहीला. मग पुनः कावल्यासारखा पुटपुटला——

" हे बघ कुणाचे मयत बियत झाले असले तर यावेळीं सांगू नकोस मला."

"कळते हो मला कुणाला काय केव्हां सांगायचे ते. कपडे काढा नी हातपाय धुवा आधीं."

पण नुसते हातपाय धुवून किशाच्या बापाचे भागले नाहीं. त्यानें चांगली आंघोळच करून घेतली. मग अंगवींग नुसती अर्धी चड्डी अडकवून उघड्या अंगानें भिंतीला पाठ लावून तो जमीनीवर बसला. आईने त्याच्या चहाचा कप त्याच्या समोर ठेवला. घशाखाली चहा रिचवीत मग त्यानें चौकशीला प्रारंभ केला.

"सांग बघूं आतां काय झालेंय ते."

"व्हायचे काय. रांडेचा कांहींच्या बाहीच करून बसलाय."

"कोण तो?"

"आणखीन कोण? लेक तुमचा."

"केलेन तरी काय?"

मग आई त्याची किशाच्या बापाजवळ सरकली. खालच्या आवाजांत सगळा इतिहास तिनें त्याला सांगून टाकला. घाबरून त्यानें विचारले——

"म्हणजे धरलानी की काय पोलीसांनीं."

"तसले कायेक झालेले नाहीं."

"गेलाय कुठे मग तो?"

"आहे तिकडे वर माळ्यावर."

"आण धरून खाली त्याला. रांडेच्याला पुरूनच येतो कुठें तरी."

"हे कसले मेले संध्याकाळच्या वेळेला दळभद्री बोलणें."

"तर काय बँड लावून वरात काढू म्हणतेस त्याची ?"

"पण मी म्हणते एवढासा पोर एवढी






मोठी चोरी करीलच कशी!"

"पण केलीन् म्हणून तर तूंच सांगतेयस ना."

"म्हणजे तो उगाच निमताला हो. खुद्द लक्ष्मीलाच इच्छा झालीय या घरांत वास करायची. हात धरून त्याचा आलीय ती.""

"असे म्हणतेस?"

"असेच आहे. नाहीं तर इतक्या दिवसांत नाहीं कधीं कुणाची दिडकी चोरायची बुद्धी त्याला झाली ती?"

"हे वरीक खरेच. मग आतां कसे करायचे म्हणतेस?"

"करायचे काय ते मी बघते. सांगते तेवढे आणून द्या आधी."

"काय आणायला सांगते आहेस?"

"खण... नारळ नी एक वेणी."

"हे खणा नारळाचे काय काढलेस मध्येंच?"

"काय काढले काय? लक्ष्मी आलीय घरांत तिची ओटी नको भरायला?"

वाप किशाचा यावर कपडे करून खालीच उतरला.

आईनें त्याला मग माळचावरून उतरवून आधीं आंघोळ करायला लावली. तो आंघोळ उरकून पुन: कोरडा होईस्तोवर वाप त्याचा ओटीचे सामान घेऊन हजर झाला.

आईनें त्याच्या मग आणखी एक निरांजन लावले. पैसे लिफाफ्यांतले एका तामणांत काढले. तामण देवासमोर ठेवले. थोरलीनें... धाकटीनें हात जोडले. किशाच्या बापानेंही हात जोडले. किशाला देवासमोर साष्टांग नमस्कार घालायला सांगण्यांत आले. आई मग किशाची बोलूं लागली——

"लेकराचा माझ्या हात धरून माझ्या घरांत आली आहेस. चुकले असेल त्याचे कांहीं तर तूंच त्याला सांभाळून घे. ओटी भरतेय तुझी ती पावून घे."

रात्री झोपताना त्याला खूपच हलके हलके वाटत होते. एका प्रश्नांत मात्र तो अजूनही गुंतून पडला होता. आई त्याची म्हणाली होती कीं कुणी लक्ष्मी त्याचा हात धरून त्यांच्या घरांत आली होती. आईला त्याच्या ती दिसली होती. बापालाही त्याच्या दिसली होतीशी वाटते. नी मग त्याचाच हात धरून आलेली ही कुणी लक्ष्मी त्यालाच तेवढी कां दिसत नव्हती? •••











चुरचुरीत खुसखुशीत आणि खमंग फरसाण

### त्याच्या अगदी उलट

अनंतराव :—माझ्या बायकोला गाता येतं, पण तिला गाण्याची बिल्कुल हौस नाही.

विनायकराव :— तुम्ही फार नशीबवान आहात हो. अहो माझ्या बायकोला बिल्कुल गाता येत नाही, पण तिला गाण्याची भलतीच हौस आहे हो.

### अट

ती :— (बाजाची पेटी वाजवीत) माऽझाऽ होऽशिल काऽऽऽ ?

तो :— (कळवळून) होईन. पण एक अट आहे माझी. लग्न झाल्यानंतर पुन्हा कधी कधी गाणं म्हणायचं नाही. आणि बाजाची पेटी तर मुळींच वाजवायची नाही. कबूल ?

### पुन्हा तेच ?

सुनीतीबाई पेटी वाजवायला शिकू लागल्यानंतर सुमारे महिन्याभराने विनायकरावांना म्हणाल्या.

"मी तुम्हाला एक छाऽनपैकी गाणं वाजवून दाखवते हं !" आणि त्यांनी त्याना एक छानपैकी गाणं वाजवून दाखवलं.

बायको मोरीत पाय घसरून पडली तरी तिचे कौतुकच करावयाचे असा बाणा असलेल्या विनायकरावांनी सुनीतीबाईचें कौतुक केलें.

"दुसरं एक दाखवू का वाजवून ?" सुनीतीबाई लाडात येऊन म्हणाल्या.

"हो, हो, वाजव ना," विनायकराव जांभई दाबून म्हणाले, "ते तोच चंद्रमा नभात, तोच चित्र कामिनी, ते येत की नाही तुला वाजवायला ?"

"अय्या ऽऽ !" सुनीतीबाई आश्चर्याने थक्क कीं काय म्हणतात तशा होऊन म्हणाल्या, "म्हंजे पुन्हा तेच वाजवूं ?"

### संगीत

मला दुःख झाले म्हणजे मी गाऊ लागतो. ते ऐकून आजूबाजूची माणसे दुःखी होतात आणि ती समदुःखी माणसे पाहून माझे दुःख हलके होते.

गडबड गोंगाटाचे जे अनेक प्रकार आहेत त्यात संगीत हा त्यातल्या त्यात कमी त्रासदायक असतो, असे माझे स्वतःचे प्रामाणिक मत आहे.

बाजाची पेटी ज्या माणसाने शोधून काढली तो अजून हयात असला तर त्याला माझ्या समोर आणून उभा करा. मी त्याचा गळा दाबून जीव घेणार आहे.

जिथे नेहमी रेडियोवर संगीत चालू असते अशाच उपाहारगृहांत मी नेहमी जातो. त्या संगीताच्या कर्कशपणांत मी अन्नाचा रद्दडपणा विसरतो आणि त्या अन्नाच्या रद्दडपणामुळे मी त्या संगीताचा कर्कशपणा विसरतो.

माझी बायको तानसेनप्रमाणे गाणं म्हणून दिवे लावू शकत नाही ही गोष्ट खरी आहे; पण ती पंचवीस फूट अंतरावर ठेवलेली पणती अगर मेणबत्ती गाण्याच्या एका तानेतच विझवू शकते ही गोष्टहि तितकीच खरी आहे.

### हरलो ! पुढे अपील नाही !

गुंडोपंत : आपल्याला तर बुवा एक आऽ आऽ आऽऽऽ सोडलं तर लाईट म्युझिक आणि क्लासिकल म्युझिक यात काय फरक आहे ते समजत नाही.

चंडिकाबाई :— वा :! नाही कसं ? समजत असलंचं पाहिजे तुम्हाला.

गुंडोपंत :— अर्थात अर्थात ! समजतं तर ! क्षणभर मला आपलं वाटलं मला समजत नाही असं.

### लघु लघुत्तम

पुढारी, नट, नटया, मंत्री, लेखक वगैरेच्या फोटोसकट छापून आलेल्या लांबलचक मुलाखती तुम्ही वाचल्या असतील. पण सर्वांत छोटी मुलाखत कदाचित् सर जेम्स बॅरी यांचीच असेल. ह्या स्कॉटिश नाटककाराला जाऊन भेटणं हे पण सोपे काम नव्हते. पण एक धाडशी पत्रकार कसाबसा त्याच्या ब्लॉकजवळ गेला. बेल दाबली. दार उघडले ते बॅरी साहेबांनी.

'मला वाटतं सर जेम्स बॅरी आपणच.

'होय. मीच तो' बॅरी साहेबांनी उत्तर दिले व पुन्हा दरवाजा लावून घेतला. बस्स ! येवढीच ती मुलाखत.

### टेलिव्हिजन कशाला ?

टेलिव्हिजनचा एक विक्रेता आपले एक अद्यावत् मॉडेल एड् विन्ला खपवावे यासाठी भेटला आणि म्हणाला "तुम्ही आपल्या हॉटेलमधल्या खोलीत आरामशीर बसा आणि टेलिव्हिजन सेटचे बटन दाबा की, एक नटलेली व सुंदर मुलगी तुमच्यापुढे अचानकपणे येऊन उभी राहिलेली दिसेल". एड् विन् म्हणाला "मी हॉटेलातून तर नेहमीच जातो आणि तुम्ही म्हणता ती गोष्ट मला टेलिव्हिजन नसतानाही मिळते की !" कार्निव्हल नाइट क्लबच्या परिसरांत एड् विन्ने एका तरुण स्त्रीची ओळख करून दिली. तो म्हणाला "ह्या मिस् सॉफ्ट ड्रिंक! ह्या सायंकाळी ७ नंतर कुणाही बरोबर बाहेर जातात"

—वि. रा. भाटकर










# मानवतेचें मॅनहोल

एका नव्या चिंतनात्मक प्रायोगिक नाट्याची कथा

--रमेश मंत्री



**मी** आहे एक सरळ माणूस. चार-चौघांसारखा. मी वास्तविक त्या आडवाजूला जायचा नाहीं. पण कांहीं योगायोगच चमत्कारिक. उन्हाळ्याची सुट्टी होती. बायका-मुलं गांवीं गेली होतीं. बायका-मुलं यांत वायकोचं अनेकवचन आलं म्हणून डोळे वटारू नका. मला एकच बायको आहे. पण ती मुलांबाळांना घेऊन कोंकणांत गेली होती. आणि रजा नाहीं म्हणून मी एकटाच गिरगांवांतल्या चाळींत निवांतपणें जीवन कंठीत होतो. अशा परिस्थितींत एका सुप्रभातीं माझा शाळासोबती मंजू उगवला. मी स्वहस्ते केलेला चहा घेत तो म्हणाला, "अंतू तू अगदी मागासलेला आहेस."

"हुं" मला त्याचें कांहीं दुःख वाटत नव्हतें. मागासले असणें ही फार सोयीची आणि कमी खर्चाची बाब आहे अशी माझी समजूत होती.

"नव्या जगाचे विदूषक-दर्शन तुला झालेलं नाहीं" मंजू म्हणाला.

"म्हणजे तुला विहंगम-दर्शन म्हणायचं आहे" मी भाबडे-पणानं त्याची चूक सुधारायचा प्रयत्न केला.

माझी कींव करीत मंजू म्हणाला, "हेंच ते. अरे मी म्हणतो ते हेंच. दर्शन म्हटलं कीं तुम्हा सनातनी लोकांना 'विहंगम'च आठवायचं. आजच्या जगांत काय चाललंय याचा तुम्हाला पत्ता नसतो. अरे आज जगाकडे विदूषक नजरेनं पहायला पाहिजे. म्हणजे वेगळ्या, चमत्कारिक, विशिष्ट किंवा अर्थशून्य नजरेनं

अनुक्रमणिका

जगाकडे पाहिलं पाहिजे. तुम्हा जुन्या लोकांच्या प्रतिमा गंजून गेल्या आहेत. निकामी झाल्या आहेत. सूर्य उगवला, कीं तुम्ही लगेच म्हणणार, 'सहस्त्ररश्मि सूर्य नारायणाची.' "

"सोनेरी किरणें चकाकूं लागली." मी त्याचें वाक्य पुरे करीत म्हणालों, "पण त्यांत काय चूक आहे?"

"यावरून तुम्ही सारे किती पेट्टी बुर्झ्वा, ठराविक चाकोरींतले आहांत हे दिसतंय्. अरे, सूर्याच्या किरणाला सोन्याचीच उपमा कशाला? आँ? कारण तुम्हा जुन्या लोकांना सोन्याचीच हाव. म्हणून सूर्य किरणाला महत्त्व देण्यासाठीं तुम्ही चिक्कू लोक त्याच्या किरणांना सोन्याची उपमा देता." मंजू आतां चांगलाच उसळला होता. मला मात्र त्याचें बोलणें नीटसे समजत नव्हतें. कारण सूर्य किरणांना सोनेरी म्हटल्यानें मी एखाद्या सुवर्णनियंत्रण हुकूमाचा भंग करीत असेन याची मला कल्पना नव्हती.

"तुम्हा जुन्या लोकांना शॉक–ट्रीटमेंट दिली पाहिजे. समाजाला धक्का दिला पाहिजे. 'एक धक्का और दे' तसा तुम्हाला आणखी एक धक्का दिला पाहिजे. त्याशिवाय तुम्ही हेकट लोक वठणीवर येणार नाहीं." मंजू अजून चवताळून बोलतच होता.

मला मात्र हा असं कां करतो आहे तें समजेना. हा बऱ्याच दिवसांनीं मला भेटायला आला. त्याचं मी चांगलं मनापासून स्वागत केलं. बिस्किटं दिलीं. चहा दिला. आणि हा लेकाचा म्हणतोय, कीं मला धक्के दिले पाहिजेत. म्हणजे काय न्याय झाला? आणि हे अँग्री यंग मेन स्वतःला पुरोगामी म्हणतात. ही पिढी म्हणे रागावलेली आहे. कां बुवा? आम्ही काय केलं आहे यांचं? पण माझे हे परखड विचार बोलून दाखवायचं धैर्य मला होईना.

"तुम्हाला वठणीवर आणण्याचा एकच उपाय आहे. तो आतां आम्ही नव्या दमाच्या लोकांनीं उपयोगांत आणला आहे."

"कोणता?" मी साशंकतेनें विचारलें. कारण ही रागावलेली मंडळी सशस्त्र क्रांति वगैरे करणार कीं काय अशी मला शंका आली. खरें सांगायचें तर मंजू आणि मी एकाच वयाचे. एकाच वेळीं शाळेंत गेलों. पण मी मॅट्रिक पास होऊन पदवी मिळवली आणि नोकरी, संसार सुरू केला. हा मंजू मात्र मॅट्रिकमध्यें नापास झाला आणि घरची परिस्थिति साधारण बरी असल्यामुळं बेकार राहूं शकला. केवळ बेकारीच्या जोरावर हा ताज्या दमाचा ठरला आणि मी चार सर्वसामान्य माणसांसारखा नोकरी धरून संसार केला म्हणून मी मात्र झालों जुना पुराणा! तरीपण सर्व समाजाला वठणीवर आणण्याचा त्याचा उपाय तरी काय तो ऐकूं, म्हणून . . . . . मी विचारल, "कसला उपाय काढला आहेस ?"

"आम्ही एक नवी नाट्यसंस्था सुरू केली आहे. तिचं नांव 'विक्षिप्त नाट्यगृह.' आमचं पहिलंच नाटक शनिवारी रात्रीं चेलाराम कलवानी शाळेंत होणार आहे" मंजू म्हणाला.

मला त्याच्या नाट्यसंस्थेचं नांव जरा विक्षिप्तच वाटलं म्हणून मी त्याला खुलासा विचारला, तेव्हां तो म्हणाला, "युरोपमध्यें थिएटर ऑफ अॅब्सर्डिटि निघालं आहे. त्या धर्तीवर आमचं हें विक्षिप्त नाट्यगृह आहे."

मग त्यानं मला त्या नव्या रंगमंचाची कल्पना सांगितली. मला कांहीं ती सगळी कळली नाहीं. पण त्याच्या सांगण्याचा साधारण आशय असा होताः मानवी जीवन हें अर्थशून्य आहे. मग नाटकालाच अर्थ पाहिजे असा आग्रह कशाला? म्हणून अर्थशून्य नाटकांची ही कंपनी आहे. प्रेक्षक आणि रंगभूमि यांच्यांत अंतर असावं हें या नव्या नाटकवाल्यांना मुळीच मान्य नाहीं. हें अंतर अजिबात काढून टाकण्यासाठीं या कंपनीचा जन्म. कंपनीचा पहिला प्रयोग 'मानवतेचं मॅनहोल' या नाटकाचा. विश्वाच्या रस्त्यावरून चालतां चालतां सबंध मानवजात मॅनहोलमध्यें पडली ही या नाटकाची मध्यवर्ती कल्पना. विश्वाच्या या प्रचंड रस्त्याखालचें ड्रेनेज कशानें विघडलें आणि तें दुरूस्त करण्यासाठीं रस्ता खोदून मॅनहोल कोणी उघडलें हें मात्र मला कळलें नाहीं. आणि सबंध मानवजात आंत पडेल एवढें हें अवाढव्य मॅनहोल रस्त्याला कसे असू शकतें असा आणखी एक प्रश्न मला पडला. पण तोहि विचारण्याचें धैर्य मला झालें आहे. एकंदरीत मंजूच्या तासभराच्या चर्चेचा परिणाम असा झाला कीं पांच रुपयाचें तिकीट मला घ्यावें लागलें आणि शनिवारीं नाट्यप्रयोगाला जावें लागलें.

रात्रीं आठचा सुमार होता. त्या शाळेच्या आसपास अंधारच होता. मी विचकत विचकत गेलों आणि शाळेच्या फलकाकडे निरखून पाहिलें. पण सगळीकडे सामसूम होतें. त्या जागीं नाटक होणार असल्याचें कसलेंहि चिन्ह दिसत नव्हतें. परि तू जागा चुकलासी असें मला भय वाटलें. पण नवे प्रयोग करणाऱ्या या मंडळींच्या काय पद्धती असतील कुणास ठाऊक म्हणून मी तसाच नेटानें कंपौंड ओलांडून पुढें गेलों. तिथें एका टेबला भोंवतीं चार लोक कपाळाला हात लावून बसले होते. त्यापलीकडे एक स्त्री आणि दोन पुरुष कुजबुज करीत होते. अतिशय अस्पष्ट प्रकाश होता. म्हणजे त्या प्रकाशांत जवळपासचा अंधार कसा बसा दिसत होता एवढाच. एकंदर वातावरण अगदी म्लान, दुःखाचें होतें. म्हणजे एखाद्या घरांत कांहीं बरेवाईट व्हावें आणि उरलेली तयारी होईपर्यंत जमलेल्या लोकांनीं गेलेल्या माणसाचे गुण आठवीत अश्रू ढाळीत बसावे तशी कळा होती. एके काळीं नव्या नाटकाचा पहिला प्रयोग म्हणजे केवढा उत्साह, झगमगाट, वाद्यें, माणसांची धांदल आणि दिवेबत्त्यांचा झगमगाट असायचा. पण हे सारे प्रकार पेट्टी बुर्झ्वा आहेत म्हणून कीं काय या प्रायोगिकवाल्यांनीं असा उलट पवित्रा घेतला असावा.

एका हातांत तिकीट आणि दुसऱ्या हातांत स्वतःचें काळीज धरून मी त्या शोकमग्न मंडळींना भीत भीत विचारलें, "नाटक इथेंच आहे ना हो?"

"होय. त्या तिथें—पलीकडे" असें म्हणून एका दुःखी चेहऱ्याच्या माणसानें मला हॉस्पिटलांतली मॉर्गची जागा दाखवावी तसें मार्गदर्शन केलें. मी धीर धरून निघालों. एका लहानशा हॉलमध्यें तीसचाळीस लोक बसले होते. अंधुक प्रकाश होता.






अनुक्रमणिका

रंगमंच, पडदा असें काहीच दिसत नव्हते. एका द्वारपालकानें बॅटरीच्या प्रकाशांत माझ्या तिकीटाचा क्रमांक पाहिला आणि माझें आसन मला दाखवलें. सबंध प्रेक्षकवर्ग अतिशय गंभीर मुद्रेनें बसला होता. एखादी शोकसभा सुरू होणार आहे असेंच एखाद्याला वाटलें असतें. मी आणि माझ्या जवळच्या दोन चार माणसांनीं पुन:पुन्हा घड्याळाकडे पाहिले आणि अखेर बरोबर नऊ वाजले.

इतक्यांत प्रेक्षकांच्या समोर साध्या कपड्यांतला एक तरूण आला. त्याच्या मागोमाग दुसरा आला. पहिल्यानें विचारले, "किती वाजले रे?"

मी एकदम भान न राहून म्हणालो, "नऊ." कारण मला वाटलें की अजून नाटक सुरू व्हायचें आहे आणि घड्याळासाठीं अडून राहिलें आहे. पण माझे शब्द ऐकतांच ते दोन उभे असलेले लोक म्हणाले, "मिस्टर, मध्ये मध्ये बोल नका. नाटक सुरू झालं आहे."

अरेच्चा! म्हणजे ही प्रायोगिक नाटकें केव्हा सुरू होतात हेंहि कळत नाहीं तर. कारण त्या पात्रांनीं रंगभूषा, वेषभूषा कांहींहि केली नव्हती. त्यामुळें ते नट आहेत कीं प्रेक्षक आहेत हेंच आधीं मला कळले नाहीं. आमच्या समोर रंगभूमि होती. पण ती उंच नव्हती. जमिनीवरच ते लोक बोलत होते. त्यामुळें नाटकांतलीं पात्रें आणि प्रेक्षक यांची पातळी अक्षरश: एक झाली होती.

"किती वाजले?"

"आठ वाजून वीस मिनिटें."

"मग नाटकाला सुरुवात करायची?"

"पण मुख्य नटी आली नाहीं."

"नाहीं का येईना. कुण्या लेकाला फरक कळणार आहे? हा झाडू. हीच आपली आजची नायिका."

इतक्यांत एक माणूस डोकीवर गादी घेऊन येतो. गादी पसरतो आणि खुशाल त्या गादीवर झोंपतो.

"हा कोण?"

"हा शाळेंतला प्यून."

"मग नाटक चालू असताना मध्येंच येऊन झोपतो?"

"त्यात काय झालं? हे वास्तव नाटक आहे. खरोखरची माणसं झोंपतातच."

तेवढ्यांत प्रेक्षकांतून पहिल्या रांगेवरचा एक प्रेक्षक उठतो आणि समान पातळीवरच्या रंगमंचावर जातो. तीं दोन तरूण माणसें त्याच्याकडे चमत्कारिक नजरेनें पाहतात. तो सांगतो, "तुमचं नाटक चालू द्या. मला झोंप आली. मी झोपतो." मग तो शाळेच्या शिपायाच्या गादीवर जातो आणि त्याला "जरा सरकून घ्या" म्हणतो. शिपाई सरकतो. प्रेक्षक त्याच्याजवळ झोपतो. या नव्या नाटकांत रंगभूमि आणि प्रेक्षक यांच्यांतलें अंतर किती कमी झालें आहे याचा आतां मला पडताळा आला. पूर्वीच्या काळीं बालगंधर्व 'सौभद्र'मध्यें नायिकेचें काम करीत असत. तेव्हां कोणी प्रेक्षक मध्येच रंगमंचावर जाऊन "अहो नारायणराव, जरा सरकून घ्या. आता मला डुलकी आलीय्" असं म्हणून कोचावर आडवा झालाय् का? नाहीं. कारण ती प्रतिगामी रंगभूमि होती. ती जुनी, बुरसटलेली रंगभूमि होती. त्या काळांत पात्रें आणि प्रेक्षक यांच्यांत अवाढव्य अंतर होतें. म्हणून तर जुनी नाटकें अयशस्वी झालीं.

यावेळेपर्यंत माझ्या लक्षांत आलें कीं हॉलमधले पंखे चालू नसल्यानें बरेंच उकडत होतें. म्हणून मी एका द्वारपालाला जवळ बोलावलें आणि म्हटलें, "अहो दारं उघडा ना. शाळेला कंपाऊंड आहे. आंत कोणी घुसणार नाहीं."

तो म्हणाला, "वा: राव! पण दारं उघडल्यावर आंतली माणसं बाहेर जातील त्याची काय वाट? आँ? ती कशी थांबवायची?"

त्याचं म्हणणं बरोबर होतं. मी मुकाट्यानें त्याला जाऊं दिलें. इतक्यांत दहावीस प्रेक्षक आमच्याकडे कुतूहलानें पहाताहेत हें माझ्या लक्षांत आलें. कारण माझं द्वारपालाबरोबरचं संभाषण म्हणजे त्या प्रायोगिक नाटकाचाच एक भाग आहे, अशी अशी त्यांची समजूत झाली! कारण सगळीच अंतरं कमी झाल्यामुळं प्रेक्षक कोण आणि नाटक करणारे कोण हें बऱ्याच जणांना ओळखायला येत नव्हतं. खुर्च्यांच्या समोर—रंगमंचावर म्हणत नाहीं–संवाद चालूच होते.

"अरे हा बघ पांडू आला. कायरे पांड्या, नाटक सुरू व्हायची वेळ आली. कुठं होतास इतका वेळ? प्रॉपर्टी आणलीस काय?"

एक 'धुंद फुंद' कथा





अनुक्रमणिका

"नाहीं. पण चार प्रेक्षक आणले."

"वरं. वरं. त्यांना सोडू नकोस. प्रॉपर्टी काय कुठंहि मिळेल. पण प्रेक्षक मिळत नाहींत."

इतक्यांत एक विचित्र पात्र 'रंगभूमी'वर आलें. त्याचा वेश म्हणजे अंगात एक फाटका सदरा आणि पायांत फाटकी चड्डी एवढाच होता. हातांत त्यानें लोखंडी सळीची एक गोलाकृति घेतली होती. हा माणूस म्हणजे त्या नाटकाचा नायक होता असें नंतर कोणीतरी सांगितले. त्याचे नांव अर्थशून्य चक्रम. पण नावावर जाऊ नका. कारण नाटककारानें आपलें सर्व भव्य तत्त्वज्ञान त्याच पात्राच्या तोंडून वदवले होते. तो नायक प्रेक्षकांसमोर येताना भितीकडे तोंड आणि प्रेक्षकांकडे पाठ करून येतो. तो म्हणतो, "हा जमाना उलटा आहे. खरं म्हणजे मी वर पाय आणि खाली डोकं करून चालायचं. मी पूर्वी तसाच चालत होतो. पण हे शिंचे हात दुखायला लागले. आता मी देवाला फोन करतो. देवा (या ठिकाणी तो फोनवर बोलू लागतो) उद्यापासून सगळ्या माणसांच्या पाया ऐवजी हात लाव आणि हाताच्या जागी पाय लाव. हॉं हॉं हॉं. मी बोलतोय. तुझा मालक. अर्थशून्य चक्रम."

मग त्याचे लक्ष जवळच्या दोन लोकांकडे जातें.

एक : नमस्कार चक्रम बुवा. हातात काय आहे.

चक्रम : हे विश्व आहे. हे विश्व म्हणजे एक पोकळी आहे. या पोकळीतून मानव पडतो. तो सरळ ड्रेनेजमध्ये जातो. पण आपण तिथं आहोत हे त्याला कळत नाही. त्याला वाटतं आपण बंगल्यात राहतो, चाळीत राहतो, ऑफिसांत काम करतो. पण सगळे मानव ड्रेनेज पाईपमध्यें राहतात.

दुसरा : पण चक्रम महाराज आतां आमचं नाटक सुरू होणार आहे. तुम्ही जरा——

चक्रम : बाजूला जाणार नाहीं. या रस्त्याला मी उभा आहे. तुमचं नाटकच बाजूनं न्या. (चक्रम खाली बैठक मारून बसतो.)

एक : उठा. नाहीतर आम्हाला नाटक बंद करावं लागेल.

मानवतेचं मॅनहोल पहात असतांना एकदम अनेकांच्या मनांत आशेचा किरण उगवला. आतां खरोखरच नाटक बंद होणार म्हणून माझ्यासकट पंचवीस तीस जण ओरडले, "ठेवा. बंद ठेवा नाटक." तेव्हां चक्रम ओरडला, "शट् अप. नाटक चालू राहणार. मी आता खुर्चीवर बसणार." (आजूबाजूला पाहातो) इथं खुर्ची नाहीं. बस्स्. (प्रेक्षकांच्या पहिल्या रांगेंतील एकाला हाताला धरून उठवतो आणि मानेला धरून गचांडी देत) मिस्टर, तुम्ही चालायला लागा. तुम्हाला हे नाटक कळत नाहीं. ही खुर्ची अडवायचा तुम्हाला अधिकार नाहीं.

असं म्हणून अर्थशून्य चक्रमनें त्या बिचाऱ्या तिकीट काढून नाटक पहायला आलेल्या प्रेक्षकाला हाकलून दिले आणि त्याची खुर्ची घेऊन तो बसला. रंगमंच यांच्यांतलं अंतर भलतच कमी झालं होतं. कारण एक नवे पात्र आता डोअर कीपरशी धक्काबुक्की करून आंत येत होते. त्याच्या हातांत पुस्तिकांचा एक गठ्ठा होता. त्या दोघांची दंगामस्ती चाललेली पाहून मला प्रथम वाटलं कीं कुणी प्रेक्षक बाहेर जाण्यासाठीं निकराचा प्रयत्न करीत आहे आणि बाजीप्रभूनें पावनखिंड लढवावी तसा द्वारपाल त्याला बाहेर जाऊं देत नाहीं. पण प्रकार उलटा होता. इतक्या निग्रहानें आत यणारा माणूस हा प्रेक्षक नसून रंगभूमीवरचें पात्रच असलें पाहिजे अशी माझी खात्री झाली. या प्रायोगिक रंगभूमीवरच्या पात्रांना जुन्या नाटकांतल्या पात्रांसारखी स्पष्ट नावेहि नव्हती. त्यांना रंगभूषा, वेशभूषा नव्हती. त्यामुळे नाटकांतला कोण आणि खरा कोण हा फरक सांगणे कठीण होतें.

तो नवा माणूस हातातला गठ्ठा घेऊन चक्रमकडे गेला. तेव्हां चक्रमनें खुर्ची आडवी टाकली होती. तीवर तो बसला होता— पण त्याचे पाय त्यानें हवेंत उलटे धरले होते. नाटककाराच्या मतें हें कसलें तरी प्रतीक होतें. मला मात्र वाटलें कीं आजकालची नाटकेंच नीट बसवली जात नाहींत असें नाहीं, तर त्या नाटकांतलीं पात्रेंसुद्धा धड बसत नाहींत.

नवा माणूस : नाटकाच्या ब्रोशर द्यायच्या आहेत.

चक्रम : मला हात नाहीत. नुसते चार पाय आहेत. ती पहा पृथ्वी माझ्याकडे येते आहे. तिच्या डोक्यांत मी टप्पल मारतो. पहा तिचा डोक्याकडचा भाग चपटा झाला.

(नायिका येते. तिचें नाव असते भाजी मंडई.)

भाजी मंडई : अय्या ! चक्रमरावांचं हें दर्शन किती प्रिय वाटतं आहे मला. सबंध जगाचं तत्त्वज्ञान यांच्या या उलटचा डोचक्यात भरलं आहे. देवा ! यांच्या सारखंच मलाहि वेड लागलं असतं तर —तर मी यांची राणीच झाली नसते काय ?

पुस्तिकांचा गठ्ठा हातांत घेऊन तिष्ठत असलेला माणूस उभा राहून कंटाळतो आणि तोच गठ्ठा चक्रमच्या डोक्यावर आपटून चालायला लागतो. चक्रम उठतो. पुस्तिका गोळा करीत म्हणतो, "या बघ चांदण्या. भाजी मंडई, लहानपणापासून आपण दोघं मित्र आहोत. तर तू इकडं ये आणि या पुस्तिका म्हणजे आकाशांतल्या चांदण्या या भंपक प्रेक्षकांना वाटण्यासाठीं मला मदत कर."

वास्तविक आम्हाला भंपक म्हटल्याबद्दल आम्हाला राग यायला हवा. पण या वेळेपर्यंत आम्ही राग लोभाच्या पलीकडे गेलों होतों. मग चक्रम आणि भाजी मंडई यांनीं हातांतल्या पुस्तिका प्रेक्षकांना वाटल्या. 'मानवतेचं मॅनहॉल' याच नाटकाच्या त्या जाहिरात-प्रधान पुस्तिका होत्या. नाटकाच्या ब्रोशर्स पात्रांनीच वाटून प्रेक्षक आणि रंगमंच यांच्यातलं अंतर कमी करण्याचा आणखी एक टप्पा गांठला गेला होता. त्या पुस्तिकेंत ॲस्प्रोची एक जाहिरात होती, ती मात्र अर्थपूर्ण होती यांत शंका नाहीं. पण या पुस्तिका वाटतां वाटतां ती बिचारी सुकुमार कोमल नायिका दमून गेली. इतक्यांत तिला प्रेक्षकांत तिची एक मैत्रीण दिसली. तिला भाजी मंडई म्हणाली, "अग दमले मी अगदी. पुढचं काम होणार नाहीं माझ्यानं. माझ्या ऐवजी आतां तूच काम कर." त्या मैत्रिणीनं आढेवेढे घेत म्हटलं, "अग पण मला संवाद कुठं पाठ आहेत ?" त्यावर नायिका

हंसून म्हणाली, " हत् वेडे ! अग यांत संवाद विवाद कांहीं नसतात. आपणच पुढं व्हायचं नि वाटेल तें बोलायचं. उत्स्फूर्त नाटकांची ही प्रायोगिक रंगभूमि आहे म्हटलं." मग नायिका नाटक पाहात बसली आणि तिची मैत्रीण रंगमंचावर गेली.

मी बावरून हा प्रकार पाहात होतो. कारण पूर्वी 'एकच प्याल्यां'-तील सुधाकर प्रेक्षकांत येऊन पीत बसला आहे किंवा सिंधु प्रेक्षक स्त्रियांत येऊन आईस्क्रीम खात बसली आहे असें कांहीं दाखवीत नसत. तसेंच प्रेक्षकांच्यापैकीं कोणी रंगभूमीवर जाऊन सुधाकराचा ग्लास संपवून टाकल्याचेंहि आमच्या पाहाण्यांत नव्हतें. पण हा प्रायोगिक प्रकार अभूतपूर्वच होता. आतां आणखी पुढें काय होणार असा विचार मी करीत असतांनाच नाटकांतला चक्रम माझ्याजवळ आला आणि हातांतलें लोखंडी चक्र माझ्या गळ्यांत अडकवून म्हणाला, "मिस्टर, माझ्यात नि तुमच्यांत भयंकर साम्य आहे. कारण आपण दोघेहि अर्धवट आहोंत."

"आँ ? मी - मी-" आतां काय बोलावें हें मला सुचेना.

"तेव्हां तुम्ही असं करा. स्टेजवर जा आणि माझं काम करा." चक्रमनें साळसूदपणें सांगितलें.

त्या प्रायोगिक नाटकानें आधींच माझें डोकें गरगरत होतें, त्यांतच ही सूचना आल्यावर मला आतां चक्कर येणार कीं काय असें वाटूं लागलें. म्हणून मी डोळे मिटले आणि शेजारच्या खुर्चीचा आधार घेतला. तेव्हां तो चक्रम हातांतल्या पुस्तिकांसह बेपत्ता झाला. जातांना त्यानें माझ्या गळ्यांतलें लोखंडी चक्र काढून नेलें हें एक नशीबच.

मी डोळे उघडले, तेव्हां तो चक्रम स्टेजवर होता. नायिका बदलली होती. तिला उद्देशून तो बोलत होता: "तू ही अशी. शून्याकडे पाठ फिरवून बसलेली. तू एक शून्य. मी एक शून्य. जग हे एक भलं मोठं शून्य. म्हणून सगळं अर्थशून्य."

नायिका : मला न्याय पाहिजे.

चक्रम : तू नेहमीची भाजी मंडई नाहीस.

नायिका : नाही. माझं नाव गोदावरी समेळ. मी नाटक पहायला आले होते.

चक्रम : गोदा. गोदा. गोदावरी, कुणाला वरी ? खरं तर नाव म्हणजे अहंकार. माणसाला नाव हवच कशाला ? चंद्राला मुळात कुठं नाव होतं ? सूर्याला कुठं होतं ? ताऱ्यांना नावं कुठ होती ? ही सारी नावं माणसांनीं ठेवली. म्हणून सारी माणसं भंकस आहेत. चल तू नि मी डुक्कर होऊं.

("चहा ऽऽ कॉफी — सोडा लेमन कोका-कोला" असं म्हणत हातांत या सर्वांचा भला मोठा ट्रे घेऊन एक विक्रेता स्टेजवर प्रवेश करतो.)

चक्रम : अरे चहावाल्या, तू नाटकाच्या आत का आलास ? तू बाहेर उभा रहा. इंटरव्हलमध्यें चहा लेमन वीक.

विक्रेता : पण नाटकाचा अंक संपनार कवी ? मघापासून भाहेर उभा ऱ्हाऊन कंटाळलो. म्हटलं सगळीजणं आत जात्यात. आपून बी जावावे.

नायिका : राहूं दे गडे त्याला आतच. (चहावाल्याला) ए. एक गोल्डस्पॉट दे. (चहावाला एक गोल्डस्पॉट देतो. ती आपल्या पर्समधून पैसे देते.)

चक्रम : बरं तर. मलाहि एक चहा आणि एक कोकाकोला मिक्स करून दे. कारण, या विश्वात चिरंतन आणि क्षणभंगुर अशा दोन तत्त्वांची अशीच सरमिसळ झाली आहे. (चहावाला एक कप चहा आणि एक कोकाकोला मिसळून ग्लास त्याला देतो) पैसे मॅनेजरकडनं घे. आणि हे बघ. प्रेक्षकांत कुणाला सोडा लेमन हवं तर दे.

आम्हाला आधी वाटलं होतं कीं हा चहावाला म्हणजे नाटकातलं पात्र आहे. पण आतां तो समज दूर झाला. मध्यंतरांत विकण्यासाठीं म्हणून त्यानं गरम थंड पेयं आणली होती. पण मध्यंतर लवकर होईना म्हणून तो आंत येऊन रंगमंचावर आणि प्रेक्षकांत शिरून हे पदार्थ विकू लागला होता. या नव्या प्रयोगाच्या नाटकांत काय काय असेल कुणास ठाऊक म्हणून आम्ही प्रेक्षक समोर दिसेल तें पाहात 'हरी हरी' किंवा 'हर हर' करीत बसलो होतो.

चहा, लेमन, गोल्डस्पॉट यांची इकडे प्रेक्षकांत विक्री चालू होती, तेव्हांच विडी, मॅचेस, सिगरेट, पानपट्टी विकणाराहि गळ्यांत ट्रे बांधून आंत शिरला. तो प्रेक्षकांच्याकडे वळणार तोंच चक्रमच्या डोक्यांत काय आलें कुणास ठाऊक. त्यानें त्या सिगारेटवाल्याला बोलावलें. रंगमंचावर—म्हणजे प्रेक्षकांसमोर—तो सिगरेटवाला आल्यावर चक्रमनें त्याचा ट्रे खुशाल आपल्या गळ्यांत अडकवला आणि त्याला तो म्हणाला: बा सिगरेटवाल्या, तू कोण आहेस ते तुला माहीत आहे काय ?



अनुक्रमणिका








विक्रेता : मी. . . आबा चोपडे.

चक्रम : नाहीं. तू शब्द विसरलेलं तत्त्व आहेस. आणि मी कोण आहे ? तर मी तत्त्व विसरलेला शब्द आहे. थांब तू इथंच. तुझ्या या सिग्रेटी मी विकून येतो.

असं म्हणून चक्रम प्रेक्षकांत आला अणि सिगरेटी विकूं लागला. माझ्या डोळचापुढें जुन्या काळांतलीं तीं बावळट नाटकं चमकूं लागली. तेव्हां जर ही सुधारणा असती, तर 'मम मनीं कृष्ण सखा रमला' हें पद गाऊन झाल्यावर रुक्मिणी प्रेक्षकांत शिरली असती आणि पुढचा प्रवेश येईपर्यंत 'बिडी मॅचीस शिग्रेट'चा पुकारा करीत राहिली असती. स्वयंवरांत 'दादा ते आले ना' असे मंजुळ शब्द बोलले जात असतांना इकडे कृष्ण पिटांतल्या प्रेक्षकांना चणे शेंगदाणे विकून चार आठ आण्याचे चणे कुरमुरे विकून थोडी कमाई करूं शकला असता. किंवा मानापमानांतला धैर्यधर आपली तलवार सांवरीत आसुसलेल्या श्रोत्यांना थोडा चहापाणी देऊन आपल्या नाईटच्या पैशांत भर घालूं शकला असता. पण नाहीं. त्या जुन्या लोकांना वेळेचा जास्तींत जास्त उपयोग करून घेण्याच्या या आधुनिक राजमार्गांची कल्पना नव्हती. ते जुने नट आपल्या एन्ट्रीची वाट पहात उगीचच विंगमध्यें बसत असत.

चक्रमनें आमच्या खुर्च्यांच्या रांगांत विडी सिगरेटची आरोळी ठोकून विक्री केल्यावर तो रंगमंचाकडे वळून मोठचानें म्हणाला, "इथं फारशी विक्री होत नाहीं. समोरच्या रस्त्यावरच्या बस स्टॉप-वर हा माल अख्वा विकून येतो." असं म्हणून तो विडी-सिगरेटच्या ट्रेसह हॉलमधून बाहेर पडून सरळ रस्त्यावर गेला. इकडे रंगमंचावर मूळ विक्रेता आबा चोपडे आणि नवी नायिका यांना काय बोलावें हें न सुचून ते दोघेहि मख्खपणें उभे होते. तोंच बाबासाहेब नांवाचे कुणी पोक्त गृहस्थ त्यांच्याजवळ आले. त्यांनीं डोक्यावर जरीचा रुमाल बांधला होता. अंगांत लांब कोट घातला होता. ते त्या दोघांना पाहून म्हणाले, "ओ, तुम्ही दोघेहि नवीन दिसता. तालमीला कधीं पाहिलं नाहीं मी."

चोपडे : लहानपणीं तालमीत जात होतो मी साहेब. सध्यां नाही जात.

बाबासाहेब : ती तालीम नव्हे रे. नाटकाची तालीम. मानवतेचं मॅनहोल हें नाटक चाललंय ना आज? काय बाई– आपलं नांव...

नायिका : (भ्रमिष्टपणें) शून्य. माझं नांव शून्य.

बाबासाहेब पुढें कांहीं बोलणार तोंच एक कारकुनासारखा दिसणारा पन्नाशीचा इसम हॉलच्या दारांतून आला आणि स्टेजच्या जागेंत गेला. तो बाबासाहेबांना म्हणाला, "मी या शाळेचा हेड-क्लार्क आहे. या हॉलचं भाडं पंचवीस रुपये."

बाबासाहेब : देऊं. कंपनीच्या मॅनेजरना भेटा.

त्याच वेळीं माझा मित्र मंजू हा रंगमंचावर आला आणि म्हणाला, "भाडं भाडं काय घेऊन बसला आहात? हें घ्या भाड. (असं म्हणून त्यानें 'मानवतेचं मॅनहोल' या नाटकाच्या पंचवीस पुस्तिका हेडक्लार्कच्या हातावर ठेवल्या.

हेडक्लार्क : हे रुपये नाहीत.

मंजू : अहो मिष्टर, शब्दांचे अर्थ बदलणारं हें नाटक आहे. आमच्या हिशेबीं एक पुस्तिका म्हणजे एक रुपयाच आहे. चला इथून. उद्यां पाहूं.

(हें ऐकतांच 'पाहून घेईन' असे काही तरी पुटपुटत हेडक्लार्क निघून गेला.)

थिएटरच्या भाडेवसुलीचा प्रवेशहि मूळ नाटकांतच घालण्याच्या या कल्पनेचं नव्या प्रयोगवाल्या प्रेक्षकांनीं टाळचा वाजवून स्वागत केलं. आतां आणखी काय काय वाढून ठेवलं आहे तें पाहण्यासाठीं मी मनाची तयारी केली. नाटकांतलें मुख्य पात्र चक्रम, तो विडी मॅचीस विकायला गेला होता, तो परत आलाच नव्हता. बस स्टॉप-वरील प्रवाश्यांना बहुधा तो जगाचें तत्त्वज्ञान सांगत बसला असावा.

आतां हा पहिला अंक कधी संपणार याची आम्ही वाट पाहात बसलों. जवळचा माणूस म्हणाला. पहिला अंक मघाशीच संपला. हा दुसरा अंक सुरू आहे. हा मुद्दा बहुतेक प्रेक्षकांत वादग्रस्त होता. तेव्हां एका प्रेक्षकानें जाहीर सभेच्या शेवटीं व्याख्यात्यास प्रश्न विचारावा तसा उभा राहून प्रश्न केला: "अहो बाबासाहेब, पहिला अंक संपला काय ?"

बाबासाहेबांनीं सांगितलें, "हें प्रयोगात्मक नाटक आहे. यांत अंक नसतात. नुसतीच मध्यंतरे असतात."

म्हणजे काय ? तें आम्हाला कळेना. पण आतां अशी तक्रार करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. गेल्या तासाभरांत आम्हाला काय कळलें होतें म्हणून हें मध्यंतराचें एकच प्रकरण कळलें नाहीं म्हणून तक्रार करायची ? तेवढचांत चक्रमनें रंगभूमीवर पुनः प्रवेश केला. त्याच्या गळचांत विडी सिगारेटचा ट्रे होता. मूळ ट्रेवाल्यानें तो त्याच्याकडून हिसकावून घेतला. सिगरेट विकून आलेले एक रुपया साठ पैसे चक्रमनें त्याला दिले. ट्रे घेऊन तो पळतच सुटला. त्या ट्रे मधील एक काडचाची पेटी घेऊन चक्रम तत्त्वज्ञान सांगू लागला: "खरं म्हणजे पृथ्वी या पेटीसारखी चपटी आहे. मी सूर्यावर जाऊन स्वतः पाहिली आहे. विश्वाच्या मॅनहोलमध्ये पडलेल्या मानवाचं जीवन हे असंच आहे. ही त्याची एक माकड छाप बाजू. विदूषकाची. त्यानें विदूषकाच्या नजरेनं जगाकडे बघावं. ही दुसरी बाजू सपाट, निळया रंगाची. ही त्याची कलेची आवड आहे. ही तिसरी बाजू. गंधकाची. हा त्याचा अहंकार. काडी ओढली की पेटतो. आजकाल त्याचा हा अहंकार कमी झाला आहे. गंधकाच्या टंचाईमुळं पेटीच्या एकाच बाजूला गंधक असतो."

या तत्त्वचिंतनामुळं त्या नाटकांतल्या मूळ नायिकेला स्फुरण चढलं. मघापासून प्रेक्षकांत नाटक पहात बसलेली ती उठली आणि तिनें आपल्या मैत्रिणीला हांकलून देऊन ती स्वतः काम करूं लागली. इतक्यांत गडचाचं काम करणारा एक जण हातांत चार आरामखुर्च्या घेऊन आला आणि त्यानं त्या जमिनीवर मांडून ठेवल्या. या वेळेपर्यंत अनेक प्रेक्षकांना झोंप आली होती. त्या सुखकारक आरामखुर्च्या पाहिल्यावर कांहीं प्रक्षक स्टेजवर धांवले आणि त्यांनीं त्या खुर्च्यां-

वर अंग झोंकून दिलं. तें पाहून चक्रमनं नायिकेला ढकलीत स्टेज-बाहेर नेलं.

त्यानंतर बराच वेळ रंगमंचाच्या जागीं अनेक लोक ये-जा करीत होते. कित्येक प्रेक्षक उठून रंगमंचावर विश्रांति घेत होते, तर कांहीं नट येऊन प्रेक्षकांच्या खुर्च्या अडवीत होते. रंगभूमी आणि प्रेक्षक यांच्यांतली रेषा इतकी संपूर्णपणें पुसून गेली होती कीं कोण मित्र पक्षाचा नि कोण शत्रू पक्षाचा हेंहि ओळखतां येत नव्हतं. मध्येंच विक्रेते येऊन माल विकत होते. लोक सिगरेट ओढीत होते. कोणी पुस्तकें वाचीत होतें. कोणी गप्पा मारीत होते. या रेषा पुसतां पुसतां इतक्या पुसल्या गेल्या कीं हें नाटक आणि रंगभूमी यांतलीहि रेषा पुसली गेली.

पाउण तास असाच गोंधळात गेला, तेव्हां मंजूला भेटून हें नाटक संपणार केव्हां हें तरी विचारावं म्हणून मी उठून ग्रीन रूममध्यें म्हणजे जिथून पात्रं प्रेक्षकांसमोर प्रायः येत होतीं तिथें गेलो. तेव्हां मंजू तिकीटांचे पैसे मोजून घेत होता. ते पैसे आणि उरलेल्या पुस्तिका तो बॅगेंत भरीत असतांनाच मी त्याला थांबवून विचारलें, "अरे मंजू, तुझं हें प्रयोगात्मक नाटक संपणार तरी केव्हां ?"

"अरे ! तूं मूर्ख आहेस झालं ?" तो कींव करीत म्हणाला. अर्थात तें त्यानें मला सांगण्याची मुळीच आवश्यकता नाहीं. त्या नाटकाला आल्या पासूनच आपण मूर्ख आहोंत हें मला पटलें होतें. मला पुढ बोलूं न देतां मंजू म्हणाला, "अरे नाटक संपून अर्धा तास तरी झाला. आमची सगळी नट मंडळी घरीहि गेली. अजून तूं काय करतो आहेस ?"

आतां मला नाटकाबद्दलचं थोडं थोडं समजूं लागलं होतं. जें नाटक समजत नाहीं तें नवनाट्य आणि जें नाटक कधी सुरू झालं नि कधीं संपलं तेंहि समजत नाहीं तें प्रायोगिक नाटक ही व्याख्या आतां माझ्या मनांत रूढ होऊं लागली.

बाहेर रंगभूमीवर प्रेक्षकांचा गोंधळ चालूच होता. उगीच बसला गर्दी नको म्हणून नाटक संपल्याची गुप्त बातमी इतर प्रेक्षकांना न कळवतां मी गुपचूप हॉलबाहेर सटकलो आणि बसच्या दिशनें वेगानें पळत सुटलों. दहा मिनिटांनीं माझ्या लक्षांत आलें कीं मी दोन बस स्टॉप पळून आतां तिसरा गांठला आहे. नवें प्रायोगिक नाट्य परिणामकारक नाहीं असें म्हणणाऱ्यांना हें बिनतोड उत्तर नाहीं काय ?

●●●

(पान १८ वरून – क्षिप्रेकांठी)

कोथळे क्षिप्रेच्या कांठीं काळ्या जमिनींत कुजले होते. फाडून टाकलेल्या कुत्र्यांकडे मांग लांडग्याच्या आनंदानं पहात बसायचा. एखादी मादी मारून समाधान झालं नाहीं तर तिच्या मेलेल्या देहाबरोबर तासन् तास खेळ खेळायचा. आजपर्यंत मांगाच्या मागं लागलेली कोणतीही कुत्री तिसऱ्या दिवशीं कधींही जिवंत परत फिरली नाहीं. पहिले दोन दिवस मांग कुत्र्यासारखा मादीबरोबर रंगायचा. आणि अचानक तिसऱ्या दिवशीं त्याच्यांतला लांडगा जागा व्हायचा. अशीच किशनप्रसादाची 'लाली' नरड्यांत दांत रुतलेल्या अवस्थेंत गव्हाच्या शेतांत सांपडली होती. बलजीमारवाड्याची 'लैला' नाचत–नाचत एक दिवस मांगाबरोबर गेली आणि तंगड्या फांसलेल्या अवस्थेंत क्षिप्रेच्या रेतींत उताणी पडलेली सांपडली. मांगावर सूड उगवायला गेलेला शेजारच्या रखेली कलालन्चा 'इल्हा' चिखलांत कुजलेल्या अवस्थेत पडला होता.

गांवच्या सगळ्या कुत्र्यांनीं एक दिवस मांगाला घेरलं आणि त्याच्यावर चौफेर हल्ला चढवला. गांवकरी मजा पहात होते. डझन दोन डझन कुत्र्यांचं तें भिरं अंगावर येत असलेलं पाहून दुसरा कोणताहि कुत्रा शेपूट पायांत अडकवून खालच्या मानेनं भिंतीला टेकत–टेकत पळाला असता. पण मांगानं उलट भिंतीला आपली पाठ लावून एकेका कुत्र्याला अंगावर घेतलं. त्या दिवशीं कुणाच्या शेपट्या तुटल्या, तर कुणाच्या फांसळ्या बाहेर आल्या. कुणाचे डोळे मेंदूसह बाहेर लोंबूं लागले. रक्ताचा आणि तुटलेल्या लचक्यांचा खच पडला होता. आणि मांग आपलं भयानक तोंड उघडून त्या डझनावारी कुत्र्यांना आव्हान देत होता. जागचा एक तिळभरहि तो हलला नाहीं. हल्ला करणाऱ्या कुत्र्यांची कुत्र्याला देखील नको–असलेली ती हलाखी पाहून बाकीचे नर उसनं चंद्रबळ आणून भुंकत-भुंकत मागं फिरले. बलराम उस्तादानं मांगाला त्या दिवशीं हार घातला. कांहींहि विशेष न घडल्यासारखा बघ्यांच्याकडे दुर्लक्ष करून मांग क्षिप्रेच्या कांठीं परतला.

रखेली कलालननं 'इल्हा' मेल्यानंतर छोट्या देवासवरून एक मादी विकत आणली. ग़ोरीपान. विलोदाच्या अंगाची. सोडावॉटरच्या बाटलींतल्या गोटीसारखे डोळे असलेली. वयांत आलेल्या घोडीसारखे स्नायू हालवणारी. वाऱ्याबरोबर खेळणारी. राखी पूनम संपली आणि एक दिवस जोराचा पाऊस पडून गेला. क्षिप्रे–कांठच्या काळ्या मातीचा भिजका वास वाऱ्याबरोबर कलालन्च्या घरावरून वहात गेला आणि 'दुलहन्' बिथरली. कसल्यातरी उबेची तिला ओढ लागली. पोटाखालच्या पोकळीची जाणीव झाली. आणि गांवचे कुत्रे आसपास कोकलूं लागले. एका काळ्याशार नरानं 'दुलहन्' बरोबर दंगा-मस्ती सुरूं केली. 'दुलहन्' पण त्याला जवाब देऊं लागली. होरीला रंग भरत चालला होता. इतक्यांत कुठून तरी

वाऱ्याच्या वेगा मांग मत्सराची आग ओकत अचानक त्या 'काळ्या'वर तुटून पडला. तंगड्या वर करून काळ्या दाणकन् जमिनीवर आपटला. आणि पुढली दुर्दशा टाळण्यासाठीं पळून गेला. 'दुलहन्' जमिनीत पाय रुतवून मांगाकडे कौतुकानं पहात होती. तो तिचा गलथानपणा मांगाला आवडला नसावा. तिनं गांवच्या इतर नरांशीं जवळीक केली होती. हा मांगाच्या दृष्टीनं मोठा गुन्हा होता. त्याच्या नजरेंत तुच्छता होती. चित्त्यासारखी झेंप घेऊन मांगानं 'दुलहन्'ची तंगडी पकडली आणि हिसडा देऊन ताडकन् 'दुलहन्'ला भिंतीवर आदळलं. मागं वळून पुन्हां 'दुलहन्'कडे पहायला देखील मांग तयार नव्हता. आला त्याच वेगानं तो क्षिप्रेच्या कांठीं निघून गेला. गांवाकडे ढुंकूनहि न पहातां चालता झाला.

गेलीं पांच वर्षें मांग क्षिप्रेच्या कांठीं दिसत नव्हता. गांवांतले कुत्रे मांगाच्या गैरहजेरीमुळें सुखांत वाढत होते. लोक म्हणत, मांग आपली जात ओळखून लांडग्याच्या कळपांत शिरला. क्षिप्रेकांठच्या एकसुरेपणाचा त्याला कंटाळा आला. क्षिप्रेच्या कांठीं चुकून देखील फिरायला हादरणारे कुत्रे आतां तिथं निर्भयतेनं हुंदडत असत. पण लोकांना व त्यांतल्या त्यांत बलराम उस्तादाला आणि बंतासिंगाच्या बायकोला क्षिप्रेकांठचं मांगाचं राज्य नाहींसं झाल्यामुळं क्षिप्रेचा किनारा ओसाड वाटायचा. मांग आसपास नसतांना क्षिप्रा उघडीबोडकी दिसायची. आंघोळ करून कुंकू न लावलेल्या बाईसारखी. रखेली कलालनच्या घरीं काम करणाऱ्या यासीन पठाणाला तिच्या ढेरपोट्या शेठजीनं हांकलून दिल्यानंतर कलालन् दिसायची तशी. कधींतरी मांग दिसेल या आशेनं लोक लांबच लांब पसरलेल्या क्षिप्रेच्या किनाऱ्यावर तासन्–तास पहात बसत. बलराम उस्ताद रात्रीं अपरात्रीं देखील क्षिप्रेच्या कांठाकांठानं फिरत राहायचा. पण कधीं मांग दिसला नाहीं. जणूं कांहीं आपल्या पराक्रमाला या गांवीं स्थान नसल्याप्रमाणें त्या षंढ कुत्र्यांचा वीट येऊन कुठं तरी दूरदेशीं तो निघून गेला होता. फड गाजवण्यासाठीं. दिग्विजयासाठीं. मांग क्षिप्रेच्या कांठीं दिसत नसे, पण कधीं आसपास झुडपांची खसखस ऐकली कीं किनाऱ्यावर फिरणारे कुत्रे काळ आल्यासारखे जागच्याजागीं निश्चळ उभे राहात असत. एखाद्या कपारीमागून लाललाल डोळे दिसले कीं केकाटत गांवांत परतत. कडव्याच्या राशींत तोंड खुपसून बसत.

आणि एक दिवस असाच 'काळ्या' कोकलत–कोकलत गांवांत शिरला. काळ्याचं भुंकणं ऐकून एकामागून एक कुत्र्यानं भुंकायला सुरवात केली. फागुनमधली दुपार ती. गांवच्या झाडून लोकांना भांग चढली होती. सगळं सुस्त झालं होतं. काळ्याच्या भुंकण्याकडे कुणाचं लक्षहि नव्हतं. आज त्याच्या भुंकण्याला वेगळा वास येत होता. तो धीर धरवत नसल्यासारखा गांवभर नाचत होता. इतर कुत्रे काळ्याच्या मागून जमूं लागले. पहातांपहातां तें कुत्र्यांचं भिरं क्षिप्रेच्या कांठीं असलेल्या दरडीवर येऊन उभं राहिलं. वीसपंचवीस कुत्र्यांचा तो थवा कसल्या तरी आसुरी आनंदानं नाचत होता. कुत्र्याला न शोभणारे आवाज करत होता. दरडीच्या पिछाडीला असलेल्या खोल खड्ड्यांत मांग देहाचं मुटकुळं करून पडला होता.

त्याचा तो तगडा देह झिजून गेला होता. म्हातारी झालेली त्याची मान त्याला सांवरत नव्हती. लूत भरल्यामुळं अंगावरचे केंस ठिकठिकाणीं गळून पडले होते. त्याहि अवस्थेंत तोंडानं खाजविल्यामुळं फुटलेल्या रक्ताच्या चिळकांड्या जमिनीवर आसपास पडल्या होत्या.

खड्ड्यांत काळ्याभोर माशा घोंघावत आवाज करत होत्या. जीव घेण्यासाठीं हजारो विषारी सुया यमानं टोंचाव्या, तशा त्या माशा मांगाला चावत हैराण करत होत्या. मधून मधून मांग झटका देऊन माशांना हांकलन देत असे. पण त्या तेवढ्याशा झटक्यानं देखील त्याला थकवा येत होता. मधून मधून असह्य वेदनांमुळें मांग पाय झटकायचा आणि मग त्राण नसल्यासारखा मलूल पडायचा. दरडीवरचे कुत्रे आनंदानं नाचत होते. क्षणांत खालच्या खड्ड्याजवळ येऊन दुरून हुंगत राहायचे. हुंगतां–हुंगतां एकदम मांगानं डोळे उघडले कीं भीतीनं परत मागं फिरायचे. त्यांना मांगाच्या जवळ जाण्याचा धीर होत नव्हता.

तो दिवस असाच वाट पहाण्यांत गेला. रात्र पडतांच कुत्रे घरीं परतले. त्या रात्रीं सगळं गांव कसं शांत होतं. चुकून एक देखील कुत्रा हू–का–चूं करत नव्हता. मांगाची, मरणाच्या दारीं घोटाळणाऱ्या त्याच्या अस्तित्वाची जाणीव त्या कुत्र्यांना अस्वस्थ करत होती. जणुं कांहीं कोणताहि कुत्रा कदाचित् भुंकला, तर मांगाच्या मरणाऱ्या देहाला पुन्हां माद येईल.

पहांटे बलराम उस्तादाच्या तालमींत घुमारा सुरू होतांच, पुन्हां तें कुत्र्यांचं भिरं क्षिप्रेच्या कांठची दरड चढून खड्ड्यांत पाहूं लागलं.

खड्ड्यांत हालचाल वंद झाली होती. कुत्र्यांचा तो खून चढलेला थवा खड्ड्याच्या तोंडाशीं पोंचला. मांगाचे डोळे वंद झाले होते. आणि फक्त मरत चाललेला श्वास सुरूं होता. अधून मधून तो श्वास देखील बंद पडायचा. पहांटेचा प्रकाश दिसूं लागतांच घोंघावणाऱ्या माशांनीं न्याहारी सुरूं केली. इतक्यांत एका तरुण नरानं धीर करून मांगाच्या देहाकडे जाऊन हुंगायला सुरवात केली. फक्त बरगड्या हालत होत्या. धीर चेपल्यामुळं त्या नरानं हळूच मांगाच्या देहाला ढुशी दिली. प्रतिकार झाला नाहीं, असं पाहिल्यावरोबर तो कुत्र्यांचा जमाव कानठळ्या बसणारे आवाज करत मांगाच्या मरणाऱ्या देहावर तुटून पडला.

कितीतरी वेळ दरडीवर एक मादी हा प्रकार पहात झेंप घेण्याच्या तयारीत बसली होती. त्या पंचवीस कुत्र्यांनीं मांगावर झेंप घेतलेली पहातांच तिनं दरडीवरून सरळ मांगाच्या देहासमोर उडी घेतली. आणि आपला क्रूर जवडा उघडून त्या वीस–पंचवीस कुत्र्यांबरोबर ती झुंज देऊं लागली. ती मादी म्हातारी होती. लढतां लढतां ती कमजोर पडूं लागली. एवढ्यांत एका कुत्र्यानं मादीचं शेंपूट हांसडलं. तोल सांवरण्यासाठीं मादी मागं वळली, असं पाहातांच एका कुत्र्यानं संधी साधून मादीचं नरडं घोटण्यास सुरवात केली. मादी पडलेली पाहातांच बाकीच्या कुत्र्यांनीं मांगाचा मरणारा देह फाडफाडून चिंधड्या करून टाकला आणि दुपारपर्यंत ते वीसपंचवीस कुत्रे सूडाच्या आनंदानं मांगाच्या देहावर नाचत होते.

दुपारीं बंतासिंगाची बायको पाणी नेण्यासाठीं क्षिप्रेकांठची दरड ओलांडून पलीकडे आली. गावांतले सगळे कुत्रे वारं भरल्यासारखे इकडून तिकडे धांवत होते. तिनं दरडीच्या पायथ्याशीं पाहिलं.

कुत्रे उन्मत्त होऊन नाचत होते. मांगाचा चिंधड्या झालेला देह क्षिप्रेच्या कांठीं निर्जीव होऊन पडला होता. आणि नरडी फुटलेल्या अवस्थेंत मांगाचं रक्षण करतांकरतां मेलेली बंतासिंगाची गढवाली विवळी वीतभर जीभ बाहेर काढून पसरली होती.

बलराम उस्ताद म्हातारपणीं नेहमीं येणाऱ्या–जाणाऱ्या पाहुण्यांना ही मांगाची गोष्ट रंग भरून सांगायचा आणि म्हणायचा, "क्षिप्रकांठीं मांगाचं राज्य आहे."

• • •






# "कमिशने" नकोत, "कृति" हवी !!

**सर्वसाधारणपणे** शासकाची (व शासनाची) प्रकृति थंड असते. क्वचित प्रसंगी तशी ती असणे आवश्यक व हिताचेही असते. त्यामुळे कांही अन्याय वाचतात. काही आत्यंतिक स्वरूपाच्या कृति टळतात आणि सामूहिक असंतोषांना वाव मिळत नाही. पण भारतात मात्र शासन आत्यंतिक थंडपणे काम करीत असल्याने (म्हणजे पुष्कळदा काहीही न करता काळकाढूपणाच करीत असल्याने) असंतोषाचे वारंवार उद्रेक होतात. ह्या थंडपणातही काही सुसंगति असती तरीही लोकांनी ती शासकीय प्रकृति (वा विकृति) मानली असती आणि तिच्या संबंधी काय बरी वाईट मते वाटली ती व्यक्त केली असती. परंतु कांही ठिकाणी मात्र सरकार हरिणाच्या गतीने धावताना दिसते तर काही ठिकाणी दोन पावले पुढे तर चार पावले मागे अशा पद्धतीने पुच्छ–प्रगति करतांना दिसते. त्यामुळे शासनाने 'स्वाभाविक' प्रगति करावी म्हणून मधूनमधून असंतोषात्मक उद्रेकांची "शॉक" ट्रीटमेंट शासनाला द्यावी लागते. आणि शासकीय 'चलनवलन' चालू असल्याची खात्री करून घ्यावी लागते. हे सारे करतांना कधी कधी फार जबर किंमतही द्यावी लागते. परंतु इतक्या 'थंड' प्रकृतीच्या शासनाला जाग आणण्यासाठी येवढी किंमत देणे अपरिहार्यच नव्हे काय? जेथे शासनही थंड आणि प्रजाही थंड तेथे सारा मामला गारेगार! पण आपले शासन थंड असले तरी जनता थंड नसल्याचा प्रत्यय अधूनमधून मद्रास, केरळ, पंजाब, बंगाल, मध्यप्रदेश, या ठिकाणच्या उद्रेकातून येतो. महाराष्ट्रात संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनानंतर जी स्थिर राजवट आली तीमुळे कांहीशी शांतता होती. (संप, मोर्चे, हरताळ हे मुंबईचे वैशिष्टय तिने कायम राखले होते हे गृहित धरूनही) गोवा आणि बेळगांव–कारवार हे दोन महाराष्ट्राबाहेरचे पण महाराष्ट्राशी भावनिक दृष्टया संलग्न असे प्रश्न आता धसास लावले पाहिजेत ह्या निश्चयाने महाराष्ट्र शासन व महाराष्ट्रीय जनता बद्धपरिकर झाल्यासारखी दिसते आहे. थंड प्रकृतीच्या शासनाला (दिल्लीकर–लोकशाहीवाले) अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळे, निवेदने, साक्षी, ऐतिहासिक पुरावे वगैरे वगैरे वैध मार्गांनी व निवडणुका जिंकून दाखवून लोकशाही मार्गाने (निदान ही भाषा तरी दिल्लीकरांना समजावी ह्या भाबडया आशेने) आज पर्यंत कामे झाली. करवसुलीला विरोध केल्यानंतर म्हैसूरी शासनाने जे साहेबी क्रूरतेचे (साधारणतः सन १८९० ते १९१० या काळांतले) वर्तन केले, त्यामुळे मानवतावादी (हळवे) शासन म्हैसूरवर घुस्सा करील, अशीही आशा बाळगली. 'पंत' गेल्यानंतर जे 'राव' चढले ते तरी काही 'न्याय' देतील म्हणून सतत दहा अकरा वर्षे सारे 'भोग' भोगले आणि 'ठोठावा म्हणजे उघडेल' ह्या न्यायाने "दिल्ली दरवाजे" ठोठावीत राहिलो. पण ह्या साऱ्या उपायातले वैफल्य जाणून (व आंदोलनाला




येणारे वैफल्य टळावे म्हणून) गेल्या महिन्यात महर्षि – सेनापति बापट, सुंठणकर इत्यादी नेते प्रदीर्घ उपोषणाला बसले. संत फतेसिंगांसारखा तपस्वी शीख प्राणांतिक उपोषणाला बसतो आणि 'पंजाबी सुम्या'चा प्रश्न कुठल्याही कमिशनकडे न जाता एकदम चक्रे फिरू लागतात. केरळमध्ये भयानक असंतोष पसरतो आणि धान्याची गोणी केरळची वाट चालू लागतात. बंगल्यातल्या असंतोषातून (असंतोषच पेरणारे) कम्युनिस्ट राजबंदी मुक्त केले जातात. (नंदाजींच्या टेबलावरच्या आरोपपत्रिका टेबलानेच खाल्ल्या काय?) महाराष्ट्राच्या ह्या दोन 'न्याय्य' मागण्यांबाबत मात्र 'कमिशने' हवीत. आणखी एक वर्ष हवे. ते कमिशन नेमण्यासाठी सुद्धा एक महिना हवा. पुन्हा त्यात काही तत्व, सिद्धांत कांही निश्चित दिशा वगैरे आहे म्हणता की काय ? अर्थातच नाही ! कारण आजचे मरण (शासनाचे की उपोषकांचे?) उद्यावर ढकलणे व काळ काढूपणाचे धोरण अंगिकारणे ही शासकीय प्रकृति (की विकृति ?) महाराष्ट्राबाबत नेहमीच कार्यरत असते. मागे महाराष्ट्र देऊं नये म्हणून जो 'विचार'- झाला तेव्हांही तीच कार्यरत होती. उपोषणानंतर कमिशनचे जे आश्वासन दिले गेले आहे. त्यामुळे कर्नाटक-म्हैसूरमध्ये बंडखोरी उसळून उठली आहे. तीत निजलिंगप्पा हे तेल ओतीत आहेत. वास्तविक एका राज्याच्या मुख्यमंत्र्याने इतके बेजबाबदार वर्तन करावे व काम-

राजांनी व इंदिराजींनी जावही विचारूं नये हे आश्चर्यजनकच ! अन्यायाने एखादा मुलूख पचवायचा आणि न्याय देण्याची वेळ येताच अकांडतांडव करायचे ही पद्धत सुसंस्कृतपणाची द्योतक नव्हे. कानडी दमदाटीमुळेच मागे वेळगावचे राणी पार्वतीदेवी कॉलेज हे कर्नाटक विद्यापीठाला जोडले गेले (बाळासाहेब खेरांच्या 'इंग्रजी' खेरीज दुसरा उपकार) आता तीच दमदाटी पुन्हां सुरूं झाली आहे. पण दमदाटीने बाजू लंगडी असल्याचेच उलट सिद्ध होते.

आता प्रश्न त्यांचा नाही. इंदिराजी कामराजांच्या प्रामाणिकपणाचा, न्यायप्रियतेचा, कर्तृत्वाचा, धाडसीपणाचा आहे. हा प्रश्न वाटतो इतका सोपा नाही. शासनानेच तो अतिशय क्लिष्ट व गुंतागुंतीचा केला आहे. इथेहि धाकदपटशानेच कामे होतात असे सिद्ध होणे भारतीय लोकशाहीच्या दृष्टीने हानिप्रद आहे. निवडणुकीचे कौल मानणे. त्यांचा आदर व्हावा म्हणून शासनाने खंबीरपणे त्याच्या पाठीशी (प्रसंगी सशस्त्रही —कारण लोकशाहीचे संरक्षण प्राणपणाने झालेच पाहिजे.) उभे राहणे अगत्याचे आहे. इंदिराजी हे धाडस दाखवतील काय? आज तरी "कमिशन'मागील भूमिका केवळ काळकाढूपणाचीच, वाटते. कारण ह्या विषयात आता गरज 'माहिती'ची नसून 'कृती'चीच आहे. 'दमदाटी'ने प्रश्न सुटणार नाहीत. कारण दमदाटीला अंत नाही हे म्हैसूर शासनानेही ओळखणे अगत्याचे आहे. इंग्रजांचे 'यावत्‌चंद्र दिवाकरौ' राज्य ही दडपशाहीने टिकले नाही. लोकशाहीचे कौल मानण्याचा मानवी (व दैवीही) मोठेपणा त्यांनी आपण होऊन दाखवावा व एक नवा 'इतिहास निर्मिण्याचे श्रेय घ्यावे.

## "रुपया" कलदार राहिला नाही !!

रात्री अकरा वाजेपर्यंत रुपया 'रुपया' होता. कलदार होता (अर्थातच चांदी कम) एक रुपया दिला की, जे काही मिळायचे ना ते अगदी सोळा आणे—शंभर पैशाचे असायचे (क्वालिटी म्हणून नसेलही—पण निदान क्वांटिटी म्हणून तरी) बाजारात रुपया 'रुपया' म्हणून चालायचा. मोठ्या डौलात. लौकिक अर्थाने तरी त्याचे मूल्य पूर्ण होते. पण रात्री अकरा वाजता (मिनिटांची चूकभूल द्यावी घ्यावी ) अर्थमंत्री चौधरी आकाशवाणीवर गेले. त्यांनी रुपया वाजविला आणि काय आश्चर्य—त्याचा आवाज 'बद्द' आला. मन चरकले. कांहीतरी चूक होते आहे असे वाटले. आणि भाषणाच्या ओघांत त्यांनी रुपयाचे अवमूल्यन केले असल्याचे सांगितले. अर्थातच हे अवमूल्यन प्रामुख्याने अभारतीय चलनाचे संदर्भात, विशेषतः डॉलर व पौंडी चलनाचे संदर्भात झालेले आहे. आणि ते कुणाच्याही दडपणामुळे झालेले नाही असे आपले अर्थमंत्री (व गोतावळा) सांगत आहेत. परंतु गेले तीन चार महिने अशा तऱ्हेच्या वावड्या उठत होत्या. जागतिक बँकेकडूनही तशा सूचना येत होत्या असे ऐकतो. कुठलाही 'रॅडिकल' बदल अकारण होत नाही. विशेषतः अवमूल्यनासारखा तर खासच नाही ! ह्याचे कारण असे कीं, ह्या बदलातून एक प्रकारचे 'मोराल' व खच्ची होत असते. आज गेल्या १८ वर्षात आपल्या अर्थव्यवस्थेने इतके चक्कर खाल्ले आहेत कीं, ह्यातून अखेर आम्ही कोठे जाणार आहोत तेच भल्याभल्यांनाही कळेनासे झाले आहे. अर्थतज्ञ धनंजयराव गाडगीळ परवा म्हणाले कीं, आजवरची सर्व धोरणे फसल्याचेच हे निदर्शक आहे. नियोजन पंचवार्षिक योजना, औद्योगीकरण ह्यासाठी ह्या देशातल्या जनतेने जास्तीत जास्त कर भरले आहेत. गेल्याच पंधरवड्यात एका इंग्रजी साप्ताहिकात आपल्या कर व्यवस्थेबद्दल लिहितांना कॉंग्रेस पार्लमेंटरी पक्षाचे कोषाध्यक्ष खासदार रामेश्वर टांटिया यांनी असे लिहिले आहे कीं, We are the highest taxed people in the world ! "जगांत सर्वात जास्त कर ह्या देशात भरावे लागतात. कोटयावधी डॉलर्सची परकी मदत गेले १८ वर्षे आपण घेतली. अवाढव्य योजना आकारल्या आणि सामान्य माणसाने अक्षरशः घाम (की रक्त म्हणू) गाळून ह्या अर्थकारणाला द्रव्यदान केले. कृत्रिम चलन फुगवटा करून त्या प्रमाणांत सोने न ठेवल्याने एक प्रकारची नापत झाली. योजनांचे डोलारे अखेर आमच्याच अंगावर कोसळले आणि आज अशा स्थितीला हे अर्थकारण येऊन ठेपले कीं, रुपयाचे अवमूल्यन करणे भाग पडले. ह्या बाबतीतले निर्णय इतक्या तडकाफडकीने घेतले गेलेले आहेत कीं, चक्रे फार जोरात फिरली असलीच पाहिजेत. अशोक मेहता आणि अर्थमंत्री चौधरी ह्यांनी लोकसभेत अवमूल्यन कल्पनेचा इन्कार कांही आठवड्यांपूर्वीच केला होता. निर्णय घेतांना मात्र लोकसभेची अनुमति आवश्यक वाटलेली दिसत नाहीं. जागतिक बँकेच्या दडपणाखालीच आजचे आपले सर्व अर्थ व शेतकी विषयक धोरण जाऊं पहात आहे. ह्या देशाने न पेलणारे हत्ती उचलले, ते अंगावर कोसळले आणि आता जागतिक अर्थकारणाचे वजनदार क्रेन्स आणून ते हत्ती उचलण्याची वेळ आली आहे. रुपयाच्या अवमूल्यनाने आजच नित्य उपयोगी वस्तूंची महागाई झाली आहे. महागाई होते म्हणून भत्ता वाढ व भत्ता वाढ म्हणून पुन्हां वाढती महागाई अशा दुष्ट चक्रांत सामान्य माणूस सापडला आहे. वटहुकूम निघाले तरी त्याची अंमलबजावणी करणार कोण ? तक्रार कुणी आणि कुणाजवळ करायची ? नफेबाजांना समाज प्रोत्साहन देतो असे चौधरी म्हणतात. पण कां देतो ? काळाबाजारांतला तांदूळ तो कां घेतो ? ह्या साऱ्यांची उत्तरे त्यांना शासकीय फायलीतच मिळतील. ती त्यांनीं शोधून काढावीत. भाववाढ रोखता आली नाही तर हा भस्मासूर भडकण्याची भीति दिसते आहे. जास्तीत जास्त कर भरून व १८ वर्षे सतत खपून ही ह्या देशातल्या जनसामान्याची स्थिति केविलवाणी झाली आहे. मागे पंडितजीनीच एका भाषणांत कबुली दिली होती. "आमच्या अर्थव्यवस्थेत श्रीमंत अधिक श्रीमंत होत आहेत. गरीब अधिक गरीब होत आहेत" हे उद्‌गार प्रामाणिक होते. पण त्यामुळें ह्या देशाची समस्या सुटत नाहीं. कांहीं मुलभूत फरक होणें मला तरी अतिशय अगत्याचे वाटते. आपले संरक्षण, आपले अर्थकारण, आपल्या विकास योजना, आपली शेती विषयक धोरणें आज कितपत स्वतंत्र राहिली आहेत हे पडताळून पाहण्याची वेळ आली आहे. स्वयंपूर्णतेच्या घोषणा आपण पाक आक्रमणाचे वेळी आवेशाने मारल्या. पण दास्यत्वाने स्वयंपूर्णता येत नाहीं. कांही अंगभूत बदल झाला पाहिजे. डॉ. गाडगीळ म्हणतात त्याप्रमाणे आमची धोरणे फसल्याने हे अवमूल्यन लादले गेले असेल तर मग धोरणे तपासून पाहणे, पराभवांचा बाऊ न करतां ती बदलण्याचा प्रयत्न करणे हेच आजच्या परिस्थितींत कर्तव्य वाटत नाहीं काय ? रुपयातील चांदी गेली तरी दुःख झाले नाही. पण रुपया 'कलदार' राहिला नाही याचे मात्र कुणाही स्वाभिमानी भारतीयाला दुःख झाल्यावाचून राहणार नाही खास ! !

**—सारस्वत**






## जरा मोठ्याने ओरडा. [ बोंब नको ]

"आम्ही स्वतंत्र आहोत. सार्वभौम आहोत. स्वायत्त आहोत वगैरे वगैरे—" (कुणाही राजकीय पुढाऱ्याचे भाषण आठवा) कळलं ना? तेव्हां आम्ही स्वतंत्र आहोत. आमची धोरणे आम्हीच ठरवतो. आता थोडी इकडे तिकडे ॲडजस्टमेंट करावी जागतेच म्हणा. पण तो 'व्यवहार' झाला. पण तत्वतः मात्र आम्ही स्वतंत्रच बरं का? हंसता काय राव? रुपया घटवला म्हणून हंसता ? पण तिथें सुद्धा आम्ही तत्व सोडले नाहीं, 'व्यवहार' बघितला. इंडो–अमेरिकन फाऊंडेशन खत कारखाने शेती विषयक योजनांना जागतिक बँकेची संमति, ताश्कंद करार वगैरे गोष्टी आम्ही केल्या बरं का पण तत्वाला मात्र आम्ही घट्ट चिकटून बसलो आहोत. इतके की कधी तत्व सुद्धा गुदमरून जाते म्हणतात. आतांचच बघा ना! बोरिस पास्तरनाक हा एक रशियन लेखक होऊन गेला. त्याने एक कादंबरी लिहिली—स्वतंत्रपणे लिहिली (आत्ता रशियात असं लिहून चालत नाही हे काय त्याला ठाऊक नव्हते?) चांगली लिहिली. मार्मिकपणे लिहिली. त्यामुळे तिला 'नोबेल पारितोषिक' मिळाले. जगभर गौरव झाला. आता जगप्रसिद्ध कादंबऱ्यावर चांगले चित्रपट काढण्याची पाश्चात्यांची परंपरा असल्याने (आपल्याकडे अपवाद फक्त तूर्त तरी सत्यजित रे) त्यांनी 'डॉ. झिवॅगो' वर चित्रपट तयार केला. भारतीय निवड मंडळाला तो दाखविला गेला ह्या गोष्टीलाही कांही महिने लोटले. (इंदिरा गांधींनी तो मुंबईत अगदी गुपचुप पाहिला असे ऐकतो) परंतु ह्या चित्रपटाच्या प्रकाशनाला अजूनहि 'होकार' दिलेला नाही. कारण पास्टरनाकने नोबेल पुरस्कार घेऊं नये असे बजावणाऱ्या रशियन राज्यकर्त्यांची हा चित्रपट भारतात दाखविला जाऊं नये अशी इच्छा आहे म्हणे! आम्ही काय खावे हे अमेरिका ठरवते. काय पहावे अथवा पाहूं नये हें रशिया ठरविणार. आम्ही जगावे की जगूं नये याची चिंता पाकिस्तान –चीन वाहणार आणि तरीहि आम्ही स्वतंत्रच बरं का! आतां रशियन क्रांतीचे कांही टप्पे रशियन राज्यकर्त्यांना दाखवावेसे वाटत नसले तरी भारतीय चित्रपट प्रेक्षकावर न पाहण्याची सक्ति कशासाठी? रशियात त्या पुस्तकाला बंदी असली तरी आपल्या देशात ती नाही. मागे जेम्स बाँड थ्रिलर्स पैकी 'फ्रॉम रशिया वुइथ लव्ह' ह्या चित्रपटाचे शीर्षक बदलण्यासाठी असेच रशियन दडपण आले होते—आणि त्याचे 'फ्रॉम ००७ वुइथ लव्ह' असे नाव करण्यात आले होते. ते करतांनाही रशियाची खुषमष्करी करण्याचाच प्रयत्न आम्ही केला. आता 'डॉ. झिवॅगो'ला बंदी घालून आम्ही रशियाचे 'फर्जी' आहोत हेच आम्ही जणुं सिद्ध करणार आहोत. 'पॅकोव्हस्की पेपर्स' ह्या पुस्तकावर बंदी घालावी म्हणूनही मागे रशियाने प्रयत्न केला होता. आपले 'स्वतंत्र' राज्यकर्ते बंदी घालायलाही निघाले होते म्हणे. पण ही 'गुप्त' बातमी (बजेट प्रमाणेच) फुटली आणि सारा डाव हुकला. आमच्या सार्वभौमत्वाचा, स्वातंत्र्याचा, कला विषयक स्वातंत्र्याचा असा सौदा झालेला चालेल आपल्याला? डॉ. झिवॅगो पाहणारच पाहाणार असे तुम्ही ठरवूं या आणि जरा मोठ्याने ओरडूं या झालं. दिल्लीकरांना 'मोठा आवाज' ऐकूं येतो बरं का. नुसती कुजबुज नको!!



## असे पाहिले असे ऐकले

## रेडिओची रडारड !

आपल्याला नेहरू हवे होते. त्यांच्या शिवाय ह्या देशाच्या राजकारणाचा व नेतृत्वाचा आपण कधी म्हणजे कध्धी सुद्धा विचार केला नाही. पण नेहरू मोठे होते तरी माणूसच होते त्यामुळे मर्त्य होते. त्यांचा दिवस उजाडला आणि ते मावळले. वाईट झाले. त्याबद्दल अजूनहि वाईटच वाटते. पण ते होते तोपर्यंत ह्या देशात एक 'चैतन्य' खेळते होते असेच त्यांचे एकूण वागणे, बोलणे, चालणे होते. त्यामुळे नेहरूंचा विचार करतांना रडारड–मरगळ–वगैरे कल्पना कशाशाच वाटतात नाही का? नेहरूंचे स्मरण चैतन्यमय असले पाहिजे. पण आमच्या आकाशवाणींची एकूण खाक्याच वेगळा बरं का? पुण्यतिथी–जयंती वगैरे बद्दलच्या कल्पनाही सांचेबंद. जुनाट–बुरसलेल्या ! त्यांना कांही नव्या कल्पना सुचतच नाहीत असे वाटायला लावणाऱ्या ! पंडितजींची पुण्यतिथी आकाशवाणीने साजरी केली. त्यावेळी रेडियोवर एक 'विशेष रूपक' सादर करण्यात आले. तुम्ही ऐकले का ते? त्यात 'रूपक' काय होते ते कळले! व्याकरण येते तुम्हांला ? साहित्याचा गंध आहे तुम्हांला ? रूपकाचा अर्थ कळतो ? हे सारे कळत असेलच म्हणा—पण 'रेडियो रूपक' मात्र कळले नसेल! नाहीच कळायचे 'रेडियो रूपक' ही खास रेडियोची परिभाषा आहे.

### शुभचिंतन !

मे. व्ही. पी. बेडेकर (मसालेवाले) कंपनीचे श्री. अण्णासाहेब बेडेकर यांचे कनिष्ठ चिरंजिव व बी. वसन्त पब्लिसिटीचे प्रोप्रायटर श्री. वसंतराव यांचा शुभ विवाह चि. सौ. कां. उषा अभ्यंकर हिचेबरोबर नुकताच मुंबईत थाटानें पार पडला. वधुवरांचे वैवाहिक जीवन सुखाचें व समाधानाचें जावो असें मनःपूर्वक इच्छितों.








तुम्ही रेडियोत नाही (तेच बरे) ना, मग तुम्हांला ती कळणार नाही. रेडियो रूपक हा प्रकार फार सोपा बरं का! ऐकायचाय्? रेडियोवरच ऐका की! अगदीच सोपा! आता नेहरूंचच रूपक बघा हं! नेहरूंच्या आयुष्यातले महत्वाचे असे प्रसंग निवडून काढायचे (नेहरू गेले त्या दिवशीचे वा दुसऱ्या दिवशीचे पेपर उपयुक्त) त्यांत सुदैवाने नेहरूजींच्या बऱ्याचशा भाषणांच्या टेप रेकॉर्डस् हाताशी असल्याने अधुनमधुन त्यांच्या तुकडयांचा वापर करायचा, झालंच तर एकाच माणसाच्या, नको त्या शब्दावर जोर देणाऱ्या आणि आरोह–अवरोह शून्य अशा आवाजात ते रूपक वाचून दाखविण्यापेक्षां दोनचार (तशीच) माणसे घ्यायची आणि आलटून पालटून ती माणसे कशी काय वाचतात याचे प्रात्यक्षिक ऐकवले की, 'रेडियो रूपक' तयार !! आहे की नाही सोपा फॉर्म्युला? घरी करून पहा! (शेजाऱ्यांची परवानगी घेतलेली बरी) पंडितजींच्या पुण्यतिथीचे रूपक इतके रटाळ, रडवे (व रडविणाऱ्या पद्धतीने) साजरे झाले की, पूछो मत!! वझे बुवांची पुण्यतिथी साजरी करतांनाही फॉर्म्युला तोच! तिथें भाषणांच्या तुकडया ऐवजी रागांचे व चीजांचे तुकडे घातलेले होते इतकाच काय तो फरक! एक सलग असा 'व्यक्तित्वाचा' परिचय याच एका पद्धतीने होऊं शकतो असे आकाशवाणीला वाटतंय् बरं का! मागे आम्ही लोकमान्यांची पुण्यतिथी साजरी करीत असू. पण दरवर्षी पद्धत वेगळी–ढंग वेगळा, योजना वेगळी! आकाशवाणीला प्रयोगांचे, कल्पकतेचे आणि प्रयत्नांचे वावडे आहे काय? सावरकर गेले, रँग्लर परांजपे गेले, डॉ. भाभा गेले—कितीतरी मोठी माणसे देवाघरी गेली–पण रेडियो सारख्या "व्यापक" माध्यमातून मिळाले काय? एक दीड वाक्यांची 'वृत्तपत्रीय' भाषणे. सावरकरांच्या वा परांजप्यांच्या व्यापक परामर्ष घेणारा एखादा कार्यक्रम का न व्हावा? मागे केशवसुत शताब्दीचे निमित्ताने एक असाच मुलाखतीचा कार्यक्रम झाला. त्यात सुद्धा असलाच प्रकार. उगीच दहा माणसांच्या मुलाखती बरं का! पण प्रत्यक्ष माहिती–नवीन काही नाही–अगदी एका शब्दाची सुद्धा! रेडियोवरच्या मुलाखती हाही गंमतीचा विषय–पुष्पा आठवले हिमालयाच्या एका शिखरावर जाऊन आली. रेडियोला ताजा विषय हवा होता–तिला बोलावले. आणि मग मुलाखत झाली. पण रंगली नाही कशी रंगणार? फार ढोबळ (व पूर्वी येऊन गेलेलीच) माहिती तिच्या तोंडून वदवायला अ. भा. नभोवाणी कशाला हवी? पैसे सुटे देण्याचे यंत्र शोधले–धरला–मुलाखत झाली. तीही अशीच झटपट रंगारी पद्धतीची! येवढा मोठा शोध त्या माणसाने लावला –पण मुलाखतीतून काही तो 'मोठा' असल्याचे जाणवले नाही. मुलाखतीतली माहिती इतकी 'वृत्तपत्रीय' करण्याचा हा अट्टाहासही गंमतीचाच!! कल्पना आणि कृति यात योजनेचा कांही भाग असतो म्हणे (हा झाला सामान्य नियम–अ–सामान्य नभोवाणीला तो कोण लावणार?)

## तोच चंद्रमा नभात

माणूस चंद्रावर पोहचला. तेथली छायाचित्रेही त्याने घेतली. एक दोन नव्हे शेकडोनी घेतली आणि पृथ्वीवरच्या माणसांना पाठवली. अवकाशातही ढगांच्या, चांदण्याच्या गालिचावर तो विहारही करून आला. माणूस खूपच खूप उंच गेला म्हणायचा. बातम्या वाचून आमच्या इथेही मंडळींना बरे वाटले. कांहींनी सर्मनला पत्रे पाठवून विचारल्याचे कळते कीं, पुढील अवकाश यात्रा कधी ? ॲडव्हान्स बुकिंगची पद्धत असल्यास आमचेही तिकिट बुक करून ठेवा अशी मागणीही अनेकांनी केली. चंद्रातला 'चार्म' गेल्याने (फोटो पाहिल्यावर काय चार्म वाटणार?) तथाकथित सांप्रदायिक कवीनी एक 'सनातन' विषय गेल्याबद्दल अमावास्येच्या रात्री स्मशानांत सभा भरविली. आणि प्रत्येक कवीने आपापल्या पुस्तकातून चंद्रावरली सगळी गाणी फाडून टाकली. वाटवे यांनी "कोणता मानू चंद्रमा" हे गाणे म्हणण्याचे बंद केले असून आता चंद्र सांपडल्याने गाण्याचे प्रयोजनच उरले नसल्याचे ते म्हणतात. रामचंद्रानेही चंद्राचा हट्ट सोडून दिला असून मारूतीला सूर्याचाच घास घेण्यासाठी फर्मावले आहे. Better luck this time असा आशिर्वादही त्यांनीं दिला आहे म्हणे. नवकवीनी मात्र चंद्रावर दगड धोंडे असल्याचे पाहून आपल्या अ–कोमल कविप्रकृतीला चंद्रलोक मानवेल–तेव्हा आम्हांला तेथे वस्तीचे स्वातंत्र्य द्यावे म्हणून आग्रह चालविला आहे. कुणाच्या कवटया, हाडके, मज्जा, मांसाचे तुकडे, रक्ताचे ओघळ, पू. लाळ वगैरे गोष्टी तिथे कितपत आहेत हे जाणून घेण्यासाठी अमेरिकन आकाशवीरांना तारा पाठविल्या आहेत. सुंदर नसलेल्या स्त्रियांनाही 'चंद्रवदना' म्हणून बनविता येत होते–तो वाव नसल्याने बरेचसे प्रेमिक, हवालदिल झाले असल्याचे ऐकतो. तर खऱ्या 'चंद्रवदना' आपल्याही चेहऱ्यावर कांही 'दगड गोटे' तर उगवले नाहीत ना म्हणून वारंवार आरशांत पाहूं लागल्या आहेत. (पॉण्ड्सची विक्री तूर्त वाढीव किंमतीतही धूमधडाक्याने होत असल्याचे कळते) चंद्राच्या रूक्षतेचा विषेध म्हणून नवविवाहीत दांपत्ये अमावास्येच्या अंधारात आता फिरायला बाहेर पडूं लागली आहेत (तेवढाच स्कोप जास्त) आणखीही खूप खूप होतंय् बरं का? बघा बघा डोळे उघडे ठेवून–माझी मात्र स्थिति विचित्र झालीय्. चंद्राकडे मी पाहतो आणि म्हणतो——

तोच चंद्रमा नभात————पण!!

–बन्याबापू









**याची देही, याची डोळा--** [ पान १० वरून ]

रंजीस झालेला धोंडो गुंडो ब्राह्मणांच्या जेवणांतल्या दिरंगाईने केव्हाच बिघडला होता. हे वखवखलेले ब्राह्मण कधी एकदाचे हात आटोपते घेतायेत आणि आपण कधी एकदाचे कोर्टात जायला मोकळे होतोय असे त्याला झाले होते त्यामुळे ब्राह्मणांचे ते खदखदणे त्याला कुच्छितपणाचे वाटले आणि तो एकदम उखडून त्यांना विचारता झाला--

"का हो, हसायला काय झालं ? तुम्ही कधी सकाळचं संध्याकाळी खात नाही? मग, शिळं पिठलं लज्जतदार असतं; माझ्यासाठी थोडं ठेव ! असं मी माझ्या बायकोला म्हटल्यावर तुम्हाला एवढं खिदळायला काय झालं ?"

मृत्युलोकांतला हा सारा प्रकार नवीन असल्यामुळे हसू आलेले हे यमदूत अवचाटाने एकदम विचारलेल्या या जाबामुळे अम्मळ गांगरून गेले आणि एकमेकांत खाणा खुणा करून त्यांपैकी एक ब्राह्मण धोंडो गुंडोकडे वळून म्हणाला--

"यजमान, आम्ही तुमच्याशी मघा खोटं बोललो. आम्ही ब्राह्मण वगैरे कोणी नसून खरे म्हणजे यमदूत आहोत. तुम्हाला वर नेण्यासाठी वास्तविक आलेलो आहोत. तुमच्याविरुद्ध पटकीचं वारंट असून आम्ही तुमचा मृतदेह यमदरबारी नेऊन हजर करण्यासाठी येथे प्राप्त झालेलो आहोत. मृत्युलोकांतील तुम्हा मानवांचं खाणं-पिणं, बोलणं-वागणं पाहून आम्हाला आश्चर्य वाटलं आणि हसू आलं."

हे ऐकताच धोंडो गुंडो मनात चपापला. काल-परवा नुकताच एका प्राण संकटांतून वाचल्याचे त्याला स्मरण झाले. वाघोबाला काय बुद्धी झाली न कळे? तो माघारी फिरला आज तर प्रत्यक्ष यमदूत थेट घरातच आले आहेत.... 'पटकीचं वारंट आहे' म्हणत आहेत-- विचारात पडलेल्या अवचटाच्या पोटांत एकाएकी कळ येऊन मुरडून आले. आणि पोट बिघडल्यामुळे सकाळपासून दोन चार वेळा परसाकडे जाऊन आलेला धोंडो गुंडो पटकीच्या वारंटाचा संबंध लक्षात येऊन चांगलाच हबकला.

पण वारंट बजवावयास आलेली यमदूत मंडळी आपल्याकडील बेलिफांच्या लायकीचीचं आहेत. शिवाय सारीजण पिठल्यावर खूष आहेत हे लक्षात घेऊन धोंडो गुंडोने जणू काही काहीच ऐकले नाही या थाटात त्यांना आणखी थोडा वेळ गप्पा टप्पात घोळावयाचे ठरविले. आवडाबाई मात्र यमदूतांची ओळख ऐकून चित्तात व्याकूळ झाली.

मंडळींचे जेवण संपत आले तसा अवचट त्यांना म्हणाला, "मंडळी जेवण झाल्यावर जरा पान वगैरे लावा. नंतर जरा वामकुक्षी होऊ द्या. तोंपर्यंत मी कोर्टात जाऊन येतो. दुपारी चहा वगैरे घेऊ आणि मग बघू तुमच्या वारंटाचं सावकाशीने--कसं ? पण खरंच, जरा बघू तरी तुमचं वारंट असतं तरी कसं ते ! आमच्या वारंटासारखीच तुमची वारंट असतात की, यमदरबाराची म्हणून खास काही निराळी असतात ते तरी बघू!

चौघांपैकी एकाने बंडीच्या खिशात हात घालून वारंट काढले आणि ते धोंडो गुंडोपुढे धरले. चाळीशी नाकावर सारखी करून अवचटाने ते नीट न्याहळून पाहिले. यमदरबारच्या सही शिक्याच्या त्या वारंटावर धोंडो गुंडो अवचट राहणार अवसरी खुर्द काही दिवसांपूर्वी ड्यू असूनही दरबारी हजर न झाल्याची नोंद होती. ही बहुधा वाघाच्या तडाख्यातून सुटल्या दिवसाची असावी हे अवचटाने ओळखले. तसेच आजचा मुडदा पटकीच्या फासाने करेक्ट अकरा वाजता आवळावा आणि तो कोर्टापुढे लागलीच हजर करावा असे फर्मान होते. ज्या टाईमाला मुडदा यमराजासमोर हजर करावयास हवा होता त्या टाईमाला यमदूत धोंडो गुंडोच्या माजघरात सौ. आवडाबाई भ्रतार अवचट यांच्या हातच्या पिठल्यातल्या शेंगा चोखण्याच्या नादात गर्क झालेले होते. घटका टळली होती. अवचटला पाईंट मिळाला. त्याच्या पोटातली कळ अजिबात थांबली. यमदूतांच्या वेंधळेपणामुळे धोंडो गुंडोला पुन्हा जीवदान मिळाले होते.

मंडळी, आता या वारंटाचा काही उपयोग राहिला नाही. हे इनव्हॅलिड झालय् ते एक असो पण तुम्ही परत गेलात की, यमराजांना नमस्कार कळवा आणि निरोप सांगा. म्हणावं, अवसरीचा हा धोंडो गुंडो मृत्यूला भिणारा नाही. जन्माला आलेला प्रत्येक प्राणि वेळच्या वेळीच गचकला पाहिजे असाच आग्रह या अवचटाचा आहे. पण माझ्या बाबतीत म्हणाल तर अशी जुजबी वारंट काही उपयोगाची नाहीत. ती काही फेटाळायची आणि बेलिफांना रिकाम्या हातानं कसं बॅक टु कोर्ट करायचं हे मला चांगलंच अवगत आहे. तेव्हा म्हणावं माझं वारंट कसं अर्जंट असू द्या आणि ते बजवण्यासाठी उगाच चिल्लर यमदूत पाठविण्यापेक्षा यमराजांना म्हणावं आपण स्वतःच या. त्या निमित्तानं अनायसा त्यांची मृत्युलोकची ट्रिप होईल.

अवचटानं खवचट बुद्धीने काढलेले हे उद्गार ऐकून यमदूत चांगलेच शुद्धीवर आले. त्यांना वेळेचे भान आले. मृत्युलोकात निघण्यापूर्वी त्यांना यमराजानी पुनःपुन्हा जे बजावले होते ते सारे आठवले. यमराजाने केलेले भाकीत खरे झाले होते. त्यांना अवसरीकराने चक्क बनविले होते आणि रिकाम्या हाताने परत जाणे त्यांच्या नशिबी आले होते. यमराजाची खेटर आता त्यांना खावी लागणार होती. 'आजचं उद्यावर ढकलावं' असं करीत करीत यमदूतांनी चार दिवस असवरीतच मुक्काम ठोकला.

झाल्या घटनेबद्दल इकडे यमराजांना यमदूतांचा फार राग आला. पण धोंडो अवचटाच्या चाणाक्षपणाबद्दल कौतूकही वाटले. एका एकःचित् मानवाने आपले मरण एकदा नव्हे तर दोन वेळा चुकवावे याचे आश्चर्य वाटले आणि 'अवसरीकर अवचटाचा मुडदा खुद्द स्वतःच आणणार' असे जाहीर केले.

दोन दिवसानंतर रेड्यावर स्वार होऊन यमराज ज्यावेळी अवचटाच्या अंगणात अदृष्य स्वरुपात दाखल झाले त्यावेळी अवचट कोर्टात जावयास निघाला होता. नेहमी प्रमाणे तो गडबडीतच होता.

"आवडाबाई, प्रकृति ज़रा नरम आहे, आज आत्ताचं जेवण नाही; रात्रीच सावकाशीनं जेवीन. कोर्टात जरा लवकर जायचय्. कोर्ट सुरू होण्यापूर्वी पानसे वकीलाला गाठला पाहिजे भडवीच्याने अजून परवाचे पैसे दिले नाहीत."

यावर आवडाबाई म्हणाली, "अहो असं काय करता? आज तर मी तव्यावरचं कोरडं पिठलं केलय थोडी दशमी खाऊन जा. तेवढाच पाण्याला आधार! उपासपोटी कशाला जाता?"

"नको ग खाण्याचं नांव काढूस बाहेर जातांना. आज जरा छातीत दुखतय् सकाळपासून. एक वेळ लंघन घडलं तर तेवढंच बरं वाटेल. तुझ्या कोरडया पिठल्याचा समाचार रात्री घेईन" असं म्हणून पायात जोडा सरकवून धोंडो गुंडो घराबाहेर पडणार; तोच—

यमराज गडगडले——"अवचटा, ऐक. तुला न्यायला आज मी खुद्द स्वतःच आलोय्. तुझी वेळ भरायला अजून अर्धा तास उरलाय तोपर्यंत तुझ्या माघं इथली काय व्यवस्था करायची असेल ती करून ठेव. हार्ट फेलचा फास आवळून मी तुला आज नेणार आहे. तू माझ्या दूतांकरवी मी स्वतःच यावं अशी उर्मट इच्छा प्रदर्शित केली होतीस ना? तर मी स्वतःच आलोय चल आटोप कर निघायची तयारी. वारंट अर्जंट आहे.

अवचटाच्या छातीत जोराची कळ आली. त्याचा जीव गलबलल्यासारखा झाला आणि अवचट मनीच्या मनी काय समजायचे ते समजून चुकला. तरीहि स्वतःला जरा सावरून तो म्हणाला——

"यमराज नेणार असाल तर न्या बापडया मला. पण राजाधिराज, आपलं दर्शन तर घडूं द्या या पामराला. तयारी ती आता काय करायची आहे निराळी? अर्धा तास आहे म्हणता तर तेवढ्यात जरा कोर्टात जाऊन येतो. पानसे वकीलाला गाठतो वसुली करतो एक किरकोळ साक्ष आहे ती उरकतो. आणि लगेच परत येऊन आपल्या सेवेला हजर होतो."

"आवडाबाई –अग, आज आपलं परम भाग्य उदयाला आलाय. आज आपल्या घरी प्रत्यक्ष यमराज आले आहेत. जरा बाहेर ये. त्यांचं दर्शन घे. त्यांना चहा दे. ते जेवणार असतील तर त्यांना पिठलं भात जेऊं घाल. तोपर्यंत मी कोर्टात जाऊन येतो–"

काय प्रकार आहे? तो पाहावयास आवडाबाई भीतभीत ओटीवर आली.

मरणाची घटका भरत आलेल्या प्राण्याची शेवटची इच्छा पुरी केली पाहिजे या यमधर्माला जागून यमराज आपल्या स्वयंभू स्वरूपात अवचट दंपतीपुढं दृष्यमान झाले. त्यांचे ते रेडयासह वर्तमान काळंकभिन्न उग्र स्वरुप प्रकट झाल्यावरोबर आवडाबाईची तर भीतीने दातखीळच बसली आणि धोंडो गुंडोच्या छातीत पुन्हा एक जोराची कळ आली. त्याचा श्वासोच्छवास मंदावल्यासारखा झाला. झटक्यातून अमळ उमगल्यावर आवडाबाई यमराजांच्या पायाशी लोळण घेऊ लागली. रडत रडत ती म्हणाली, "देवा, मला ना मूल ना बाळ! पतीविना मी माझं रांडपण पुढं कसं गुदरूं? यमराज त्यांच्याऐवजी मला न्या पण त्यांना राहू द्या. आहेवपणी मला मरूं द्या. मग दृष्टी आड सृष्टी. माझ्यामागं त्यांचं काही का होईना. यमराज मला मुलगी समजून माझ्यावर दया करा." यावर यमराज म्हणाले,

" ते होणे नाही! आवडाबाई तसे काही होणार नाही. या माणसावर दया करावी आणि त्याचे प्राण वाचवावेत अशी पुण्याई पदरी नाही. त्रेता युगात पूर्वी एकदाच सतिसावित्रीच्या विनवणीला मी फसलो होतो आणि सत्यवानाचे प्राण मी परत केले होते पण सत्यवान तसा सत्‌शील पुण्यात्मा होता; एक्स्सेप्शन् म्हणून ते घडलं. तुझा पति निमकहराम आहे त्याचं चारित्र्य तुला ठाऊक आहेच? तरी त्याच्या प्राणाची व्यर्थ याचना तू मजजवळ करूं नकोस आणि स्वतः पापाची धनीण होऊ नकोस. तुझ्या याचनेचा आता काहीही उपयोग होणार नाही. आज आम्ही त्याला नेणार म्हणजे नेणारच! शांत हो, वाळे आवडे, शांत हो!

देवा यमराजा, काय मूर्ख बायको आहे, पहा. खुळीला माझ्या या मरणातलं मोठेपणही धड कळत नाही. केवढं माझं भाग्य की खुद्द यमराजानं येऊन माझ्या प्राणाची मागणी करावी? काय सांगावं देवा, आयुष्यभर हिनं असंच केलं. माझं मोठेपण हिला थोडंसुद्धा कळलं नाही. माझ्या व्यवसायाची, खाण्याची वागण्या बोलण्याची तिनं आयुष्यभर टिंगल केली. मी एक म्हणालो की ही म्हणालीच दुसरं काही तरी. आणि आता मार माझ्या प्राणाची भीक मागत आहे तुमच्याजवळ! आत्ताच तुम्ही येण्यापूर्वी मी तिला म्हणत होतो– तूं केलेलं कोरडं पिठलं मी रात्री खाईन–तर म्हणाली–अन्नाला डावलून जाणं चागलं नाही. रात्रीचं कोणी पाहिलय्?–आता तुम्हीच सांगा यमराज तुम्ही त्रिकाल ज्ञानी आहात म्हणून विचारतो आवडीनं केलेलं कोरडं पिठलं मी रात्री खाल्लं तर एवढं काय बिघडणार आहे?"

अवचट आपल्याला काही तरी घोळात घेण्याच्या विचारात असावा हे यमराजाने ताडले आणि त्याच्या त्या प्रश्नाला उत्तर देण्याच्या फंदात न पडता यमराजाने आवडाबाईने शांत व्हावं म्हणून तिची समजूत घालावयास पुन्हा सुरुवात केली.

जन्ममृत्यूंतल फोलपण एक मानवाला आणि तेही एका बाई माणसाला पटवून देण्याच्या विवेचनात रेडारूढी गुंतलाय् असे पाहून अवचट तेथून निसटला आणि कोर्टात येऊन कामाला लागला. पानसे वकीलाशी त्याने साम दाम दंडभेदादी भाषा वापरून संम्याला फोडण्याबद्दलचे रुपये त्यांच्याकडून वसूल केले. ही वसूली त्याने अगदी स्थितप्रज्ञाच्या जाणीवेने केली. या मृत्युलोकाचे आपण केवळ घडी दोन घडीचे रहिवाशी आहोत याची थोडीसुद्धा खंत त्याच्या मनात वसुली करताना नव्हती. तेवढ्यात त्याला लांबून येणारा संम्या रामोशी दिसला. संम्याला त्याला अर्थातच् चुकवावयाचे होते. वास्तविक संम्याला त्यानेच वायदा करून बोलावले होते. आज त्याला तो राहिलेले पैसे 'जमलं तर देईन' म्हणाला होता म्हणून बिचारा संम्या आला









होता. पण त्याला पहाताच धोंडो गुंडो या कोर्टातून त्या कोर्टात तर कधी बार रूममधून कँटीनमध्ये या प्रमाणे संम्याच्या दृष्टीआड होऊं लागला आणि——

'धोंडो गुंडो हजर आहे... धोंडो गुंडो अवचट'... अशी पट्टेवाल्याची ललकारी ऐकताच भडभडे कोर्टापुढे पिंजऱ्यात येऊन दाखल झाला.

या धावपळीचे निमित्त होऊन अवचटाला चांगलाच दम लागला होता. अंगाला कापरे सुटून घाम आला होता. चक्कर येऊन आपण पिंजऱ्यातल्या पिंजऱ्यात खाली तर पडणार नाही ना? अशी त्याला भीति वाटत होती.

घ्या शपथ; म्हणा देवाशपथ खरं सांगेन.....असे कोर्टाने सांगितल्यावर——

अवचटाने शपथ घ्यायला तोंड उघडले—देवाशपथ खरं सांगेन....हे शब्द कसेबसे त्याच्या तोंडून बाहेर पडतात न पडतात तोच भडभडे साहेबांच्या मागील बाजूस भिंतीवर नेहरू गांधींच्या मध्यभागी असलेल्या घड्याळात साडेअकराचा टोला ठण्णदिशी पडला आणि इकडे अवचट खाली कोसळला. उम्याचा आडवा होता होताच त्याचे प्राणोत्क्रमण झाले. अवचट हार्टफेलने दगावला. साक्षीच्या पिंजऱ्यात धोंडो गुंडोसारख्या हरकामी आणि सराईत साक्षीदाराची अखेर करण्यात नियतीने काय साधले असेल, हे एक त्या नियतीलाच माहीत!

मरणांतानि वैराणि!

धोंडो गुंडोच्या या शेवटच्या क्षणापर्यंत—कधी उलथतय् हे थेरडं एकदाचं? असं म्हणून नित्य त्याला मरण चिंतणारे यच्चावत कोर्टजन आता या अवचटाबद्दल हळहळू लागले. साऱ्या कोर्टवासियांना आता धोंडोपंताचे गूणच गूण आठवूं लागले. जो तो म्हणूं लागला, अरेरे असा परोपकारी मनुष्य मिळणे कठीण.

पानसे वकील मात्र मनातल्या मनात स्वत:वर चडफडत होता. दहा पंधरा मिनिटांसाठी त्याने घाई केली होती. त्याने थोडी कळ काढली असती, आजचे उद्या केले असते तर त्याचे शंभर रुपये वाचले असते. पण स्वत:वर चडफडण्यापलिकडे आता तो काहीही करू शकत नव्हता.

जाचकवाडीच्या संम्या रामोश्याचे उरलेले चाळीस छत्रपती आता मातीत गेले होते. वर हरीभाऊ पाटलाचे कायमचे शत्रुत्त्व त्याला पत्करावे लागणार होते. मनातल्या मनात मेल्या भटुडर्याची आई माई उद्धरणे एवढेच त्याचे हाती आता उरले होते. आणि ते तो मनातल्या मनात करीत होता.

याप्रमाणे आवडाबाईचे कुंकू पुसून आणि हार्टफेलने आवळलेला मुडदा पाठीशी टाकून यमराज स्वर्गात दाखल झाले, त्यावेळी दुपारचे बारा वाजून दहा मिनिटे झाली होती. सोम प्रदोष असल्यामुळे आज यमराजांचा दरबार दुपारी एक ते पाच पर्यंतच होता. धोंडो गुंडोचा मुडदा इतर मुड्यांच्या रांगेत ठेवण्यासाठी यमदुतांच्या हवाली करून यमराज स्वत:च्या राहत्या महालाकडे गेले. यमराज्ञी त्यांची वाटच पाहात होती. अमृत कलश तोंडाला लावता लावता ते यमीला म्हणाले 'राणी सरकार मी आता कोर्टात जाऊन येतो. पाच वाजता परतलो की, मर्त्यलोकांतील गमती जमती तुम्हाला ऐकवीन. तुम्ही अगदी खूष व्हाल'!

यमाच्या दरबारात मुड्यांमागून मुड्यांचा फैसला चालू होता. आयुष्यभर केलेल्या पापपुण्यांचा झाडा वाचला जाई. चित्रगुप्त ज्याची त्याची खाती समजून देई आणि पापपुण्य लक्षांत घेऊन यमराज मुड्याला शिक्षा ठोठावी. कुणाला पुनर्जन्म, कुणाला नरक तर कुणाला स्वर्ग असा निकाल दिला जाई. एखाद्याला उंटाचा पुनर्जन्म मिळे. एखाद्याला वटवाघुळाच्या योनींत पाठविले जाई. कुणाला ५।१० वर्षे नरकवास दिला जाई. होता होता धोंडो गुंडो अवचट राहणार अवसरी खुर्द पुकारला गेला. चित्रगुप्ताने अवचटाच्या नावावर असलेली पापांची भली मोठी यादी वाचून दाखविली आणि भाष्य केलं की सर, "या अवसरीकराने जन्मभर अनेकांना नागावलं आहे. खोटया साक्षी दिल्या आहेत. विश्वासघात केलेले आहेत.......

यमराजाने अवचटाकडे एकवार क्रुद्ध नजरेने पाहिले आणि फर्मावले की, "याला ५० वर्षे नरकात खिचपत पडू द्या..."

यमदूत पुढे झाले आणि त्यांनी अवसरीकराच्या मुड्याला काढण्या बांधायला सुरुवात केली तसा अवचटाचा मुडदा म्हणाला.. "थांबा महाराज, थांबा. हे काय कोर्ट आहे की तमाशा आहे? काही न्याय अन्यायाचा निवाडा आहे कां नाही? आरोपीला त्याची बाजू मांडण्याची संधि द्याल की नाही? वारे न्यायदान यापरती आमची पृथ्वीवरची गरम डोक्याची फौजदारी कोर्ट बरी. मृत्युलोकांत असला आंधळा कारभार नाही. आरोपीला स्वत:चा बचाव मांडवयास तेथे संधी दिली जाते. येथे स्वर्गद्वार असून साराच अंधार दिसतोय. अंधेरी नगरीत राजा बोलतो आणि कारभार चालतो असाच सारा प्रकार येथे दिसतोय! न्याय कसला न्यायाचं हे नुस्त नाटक आहे नाटक!"

अवचटानें एक आवंढा गिळला आणि चित्रगुप्ताकडे वळून त्याने विचारले, "महाराज पापांची बाजू वाचलीत, काही पुण्य असेल तर पाहा माझ्या खाती."

"फार बकवा करू नकोस" यमराजाने दरडावून अवचटाला हटकले. "मर्त्य लोकांतली तुझी कोर्टबाजी आम्ही ऐकून आहोत. खऱ्याचं खोटं आणि खोटयाचं खरं करण्यात तुझी सारी हयात गेली पण तसला बुद्धिवाद येथे चालायचा नाही. पापपुण्याची वजावट होऊनच येथे निवाडा केला जातो. पक्का बिलंदर माणूस तूं! मृत्युलोकांत साऱ्यांना नको नको केलंस एवढंच नव्हे तर माझ्या कोर्टाची दोन वारंटही तू चुकवलीस त्यासाठी माझ्या दूतांना तूं अन्नाच्या मोहात गुंतवलस, लाच लुचपत केलीस. तुला कसली आली आहे बाजू पुण्याची? केवळ आवडाबाईसाठी तुझी गय करतोय् आणि पांच मिनिटं तुला देतोय्. थोडक्यात तुला काय सांगायचं असेल ते सांग आणि नरकाची वाट चालू लाग."

मुड्याचा जिवंत मानव झाला आणि बोलूं लागला—

अनुक्रमणिका

"आभारी आहे महाराज आपला मी. मी चित्रगुप्तला काही प्रश्न विचारणार आहे ते मला विचारूं द्या. माझी वकिली करायला येथे कोणी मिळणार नाही याची मला कल्पना आहे. अर्थात माझा मी समर्थ आहे माझे काम चालवायला. माझी कैफियत ऐकून घेऊनही कोर्टाला मी नरकात जायलाच योग्य आहे असं वाटलं तर पन्नासच काय पण आणखी काही वर्षही मी नरकात जायला तयार होईन. आणि माझी बाजू ऐकून जर गुन्हेगाराचा गुन्हा शाबीत झाला नाही तर मात्र महाराज मला स्वर्गसुद्धा नको, मला आपला अवसरीलाच परत जाऊं द्या. तुमच्या देखतच मी आवडीला शब्द दिलाय, रात्रीसाठी आवडीनं माझ्या करता पिठलं झाकून ठेवलं असेल, तो मला पाळूं द्या."

अधिक पाल्हाळ नको काय सांगायचय् ते झटपट सांग. हे काही तुमच्या पृथ्वीवरील कोर्टासारखं कोर्ट नाही. आवर!"

तात्काळ घोंडो गुंडो चित्रगुप्ताची क्रॉस घ्यायला उभा राहीला. त्याने यमराजाला अदबीनें नमन केले, परवानगी दिल्याबद्दल थँक्स मानले आणि सुरुवात केली—

**क्रमशः**

## क्षणोक्षणी उत्सुकता वाढवील असा 'याची देही' उत्तरार्ध सप्टेंबरमधे वाचा

**( आमचेहि एक मत पान ५ वरून )**

### कलाप्रिय दीपवाली

श्री संपादक 'दीपावली' यांस—

सप्रेम नमस्कार वि. वि.

'नंदलाल वोस' हा दा. गो. देशपांडे यांचा श्रद्धांजलिरूप परिचयलेख वाचल्यावर आपण केवढ्या एका थोर चित्रकाराला मुकलो याची जाणीव होते. 'दीपावली'-सारख्या कलाप्रिय मासिकांत नंदलालांविषयीं तत्काळ मजकूर आला नसता तरच नवल ठरलें असते.

सदा कऱ्हाडे यांची 'डोळे' ही कथा फार आवडली. विवाहापूर्वीच्या प्रेयसीचे 'डोळे' नायकाला कसा त्राही भगवान करून सोडतात त्याचें हृदयस्पर्शी चित्रण कथेंत आहे. उन्नत उरोज, त्याची गोलाई इ. स्वप्नसृष्टींतला भाग वगळूनहि कथेची उंची कमी झाली नसती. कथेचा शेवट मात्र विसंगत वाटतो.

वसंत फेणे यांची 'पमाताई' म्हणजे त्यागाची मूर्ति आहे. सुखाबरोबर दुःखांतहि पतीच्या पाठीशी रहाण्याविषयी ती आवाहन करते.

नीलकण्ठ नांदुरकर यांचा 'थ्रिल' वाचनीय आहे. 'थ्रिल नाही, थ्रिल नाही' म्हणून जन्मभर ओरड करणाऱ्या साहेबांच्या जीवनांत अखेरीला एक साठी उलटलेली स्थूल वृद्धा बालमैत्रिण म्हणून उभी रहाते व 'उर्वरित आयुष्य साहेबांबरोबर कंठण्याचे' म्हणते तेव्हां साहेबांबरोबर वाचकालाहि 'थ्रिल' वाटतो, गोड धक्का बसतो. जीवनांत प्रत्यक्ष 'थ्रिल' आल्यावर साहेबांची झालेली अनुकंपनीय स्थिति बघण्यासारखी आहे.

सांताक्रूझ

आपला,
**रमेश महाडिक,**

### खरोखरच विशेष

स. न. वि. वि.

महाराष्ट्रात सध्या जी काही प्रमुख अशी मराठी नियतकालिके, मासिके निघतात त्यांच्यामध्ये प्रत्येक महिन्यास 'विशेष' काहीच नसलेला 'विशेषांक' काढण्याची टूमच निघाली आहे. विशेष नसलेला विशेषांक काढून आर्थिक फायद्यासाठी अंकाच्या किमती वाढवावयाच्या हे सध्या मराठी मासिकांच्या बाबतीत चालू आहे!

परंतु आपल्या दीपावली मासिकाच्या बावतीत वरील विवेचन लागू नाही हे साहित्य व कलेला मासिक वाहिलेले असतेच. पण संगीताने नटलेला आपला मेचा खास अंक वैशिष्टयपूर्ण वाटला. खरोखरच विशेष वाटला.

'बहुजन हिताय बहुजन सुखाय' ह्या ध्येयाप्रमाणे खरोखरच आकाशवाणी कार्यक्रम सादर करते काय? कलाकाराचे, आकाशवाणीचे तंत्रज्ञांचे संगीत विषयक कार्यक्रमांतले दोष, इत्यादी गोष्टींचा उहापोह करणारा 'अशोक दामोदरांचा' लेख मननीय वाटतो.

सूक्ष्म अवलोकनाची आपली खास संगीत राजकीय व्यंगचित्रांबाबत तर आपने कमाल कर दिया! असेच म्हणता येईल.

गोपाल कृष्ण भोवे व जितेंद्र अभिषेकी ह्या जाणकार संगीतकारांच्या 'तानसेन' व 'मारवा' ह्या कथा आवडल्या. मुखपृष्ठ अंकाला साजेल असेच आहे! धन्यवाद.

पुणें

आपला,
**प्रसन्नकुमार अकलूजकर**

### पहिल्या बक्षिसाचे मानकरी

महाराष्ट्र राज्य शेतकी खात्याचे विद्यमाने मुंबई येथें नुकत्याच भरलेल्या पांचव्या महाराष्ट्र राज्य आंबा प्रदर्शनांत बेडेकर आंबा लोणचें व मुरांबा यांना नेहमीप्रमाणें प्रथम पारितोषिक मिळाले.

५५ वर्षांचा दीर्घ अनुभव, उत्तम कच्चा माल व योग्य किंमत यामुळें बेडेकर उत्पादनें समाजांतील सर्व थरांत सारखीच लोकप्रिय ठरली आहेत.

वरील पारितोषिक मिळवून वेडेकरांनी या उद्योगांतील आपलें श्रेष्ठत्व पुन्हां एकदां कायम केले आहे.

## साभार पोंच

**पालखीच्या संगे**
कवि प्रा. मधुकर केचे
ठाकूर आणि कं. अमरावती
मूल्य ३.०० रु.

**श्रीराम प्रकाशन, मुं. २**

**पांघरुण**
ले. सौ. वसुंधरा पटवर्धन
मूल्य ५.०० रु.

**आंबळी कोशिंबीर**
ले. उमकांत ठोमरे
मूल्य ४.०० रु.

**निवडुंग**
ले. शं. ना. नवरे
मूल्य ४.०० रु.

**वारा**
ले. शं. ना. नवरे
मूल्य ४.०० रु.

**ओलेता दिवस**
ले. श्री. ज. जोशी
मूल्य ४.०० रु.

**व्होरा आणि कं., मुं. २**

**आवाहन**
अनु. गोविंद तळवलकर
मूल्य २ रु.

**ते तेथे उभेच आहेत**
ले. सुधाकर प्रभु
मूल्य २ रु.

**सम्राट चंद्रगुप्त**
अनु. भाऊ धर्माधिकारी
मूल्य २.५० रु.

अनुक्रमणिका













अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

